


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)






महाराष्ट्र शासन

मराठी भाषा विभाग

**राज्य मराठी विकास संस्था**

एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,

धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६

संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com


# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

चित्रकार दीनानाथ दलाल ह्यांनी सन १९४७ ते १९७१ दरम्यान प्रसिद्ध केलेल्या दीपावली ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीय स्वरूपात जतन करण्याबाबतचा प्रस्ताव चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे राज्य मराठी विकास संस्थेस प्राप्त झाला होता. सदर प्रस्तावानुसार दुर्मिळ मराठी ग्रंथांचे संगणकीकरण ह्या प्रकल्पांतर्गत दीपावली नियतकालिकांचे अंक संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात राज्य मराठी विकास संस्थेद्वारे सहमती दर्शविण्यात आली.

चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला ही सामग्री संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहे.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका








# दीपावली

संगीत विशेषांक

मे, १९६७

वर्ष २३ वे

मूल्य १॥ रु.

अनुक्रमणिका






# संगीत विशेषांक

**संगीताला वाहिलेला दुसरा विशेषांक!**

मे महाराष्ट्र दिन १९६७ ❋ मूल्य १॥ रु.

## श्रेयनामावलि—

**संगीत शास्त्र**...**लो. बाळ गंगाधर टिळक** यांचे मर्मग्राही विचार ● **कधी काळी हे गीत बंद होता. . .** भारताबाहेर सगळे मिळेल पण लताबाईंचे गाणे कुठे ऐकणार? **–जितेंद्र अभिषेकी** ● **नजरा नहीं आंदावे**...तापल्या तव्याने प्राण शोषले पण प्रीत राहिलीच–**गोपाळकृष्ण भोबे** ● **छत्रपति शिवाजी महाराज आणि कवींद्र रवींद्रनाथ टागोर**...बंगाल–महाराष्ट्राला निगडित करणारा धागा–**श्रीपाद जोशी** ● **तार**...एकपानी कथा–**कानसेन** ● **कथा कुणाची व्यथा कुणा**...कलावंतांचा असीम त्याग–**अरविंद विष्णु मुळगांवकर** ● **अवगुनि क्या जाने गुन की सार ?**...एक दरबारी किस्सा–**दरबारखाँ** ● **संगीतातील कालविशिष्टता**–महत्व प्रगतीला की परंपरेला?–**रसिकपिया** ● **क्षणकरवाडीचा संगीत महोत्सव**–एक मस्त बट्ट्याबोळ–**राजाराम हुमणे** ● **स्मृति-गान**–एका संगीततज्ञाच्या आठवणी–**कै. पं. ज. वि. पेठे** ● **घरबसल्या संगीतसभा**...ध्वनिमुद्रिका–**अभिजित** ● **परिसंवाद**–संगीताचे श्रेष्ठत्व आणि लोकशाही शिवाय असे पाहिले, असे ऐकले; सन्मानपुष्पे, ऐसी अक्षरे.

**संगीत राजकीय जल्लोष**–राजकारणाचा दंभस्फोट करणारी बिंगचित्रे

Gram : Dalalart
टे. नं. ३५७७६५




● संपादक-मुद्रक-प्रकाशक-मालक श्री. **दीनानाथ दलाल,** दलाल आर्ट स्टुडिओ, ४०–४२, केनेडी ब्रीज, मुंबई ४. **या प्रतीस** किंमत १॥ रु. + रजि. पोस्ट ५५ पैसे. वार्षिक वर्गणी, दिवाळी अंकासह रु. १२॥. अंकांत प्रसिद्ध झालेलीं मतें ही चालकांचींहि अधिकृत मतें असतातच असें नाहीं प्रकाशित चित्रें व लेख यावरील सर्व हक्क दलाल आर्ट स्टुडिओच्या स्वाधीन आहेत.
Registered with the Registrar of Newspapers For India under No. RN 1612/57
DIPAVALI : Dalal Art Studio, 40-42, Kennedy Bridge, Bombay - 4.







अनुक्रमणिका

# रंग लाती है शमा कुर्बानीसे....

संकल्प आणि सिद्धी साधकानांच साधते. दीपावलीच्यार सिक वाचकांनी मे १९६६–च्या संगीत विशेषांकाला ला जबाब दाद दिल्याने, संगीत विशेषांकाचा संकल्प यंदाहि सोडला, नि पूर्ण केला, तोहि रसिकांच्याच आधारे.

मैफिल रंगण्यासाठी कलावंत व श्रोते यांच्याच तोलास तोल साथीदार असावे लागतात. सांगावयाला आनंद वाटतो, की गत वर्षी ज्यांच्याकडे आम्ही काहीसे घास्तावूनच साथ मागितली होती, ती सारीच मंडळी कायमचीच आमची बनली. आम्हीहि त्यांचेच झालो. 'रंगात रंगले...गुंगोनि मन हे आनंदले' असं काहीसं झालं म्हणाना. यंदाहि महाराष्ट्र-दिनानिमित्त हा अंक निघाला, आणि ललितकलांचे आशास्थान असलेले समाज-कल्याण-खाते श्री. मधुसूदन वैराळे यांच्यासारख्या रसिक आणि रसिल्या पुरुशोत्तमाकडे आले, हा दुग्ध-शर्करा योगायोग.

लो. टिळकांसारख्या धुरंधर, चतुरस्त्र नेत्यालाहि, सुमारे पाउणशे वर्षांपूर्वी संगीत आणि सामाजिक जीवनाचा अन्योन्य संबंध लक्षात घेऊन 'केसरी'-मधे दि. २३–८–१८९२ रोजी अग्रलेख लिहावासा वाटला, यातच संगीताचा गौरव आहे. त्या थोर विभुतीने मांडलेले विचार "द्रष्टयाचेच विचार" आहेत, हे आजहि अगदी पाश्चिमात्य शाली त्यायलेल्या जाड्या पंडितानासुद्धा मान्य करावेच लागेल.

'सांस्कृतिक' या नांवाखाली जे काही सरकारी तसेच खाजगी रीत्याहि हल्ली सादर केले जाते, त्याच्या संयोजकांनी खरोखरच लो. टिळक यांच्यापासून त्याहिबाबतीत लीनतेने पाठ घ्यावेत. तरच महाराष्ट्रीय संस्कृति ही 'उद्‌घोषित' न राहता साकार होईल. ललित-कलापीठाची स्थापना करण्याचे दिवंगत मुख्यमंत्री दादासाहेब कन्नमवार यानी जाहीर केले होते. ( दुर्दैवाने हे तिसऱ्यांदा सांगण्याचा हा प्रसंग ) पण प्रत्यक्षात काय घडले? पैसा खर्चच करावयाचा म्हटल्यानंतर तो कसाहि नि कोठेहि खर्च होतो. पण भाराभर संस्थाना तगविण्यास थेंबथेंब साह्य करण्यापेक्षा हा अमृतकुंभच निर्माण केला तर?

'शिवाजी-उत्सव' हे कवींद्र रवींद्रनाथ टागोर यांचे काव्यहि वेगळ्या प्रकारचे पण तितक्याच तोलामोलाचे आहे. "तुमचे हे काव्य युद्धाशिवाय बंगाल व महाराष्ट्र यांचे मीलन घडवून आणील", असे पत्र लोकमान्यांनी त्याबाबत कवींद्राना लिहिल्याचे ऐकिवात आहे. बंगालच काय पण साऱ्या भारताच्या महाराष्ट्राविषयी असलेल्या अपेक्षा कवींद्र टागोर यानी काव्यबद्ध केल्या आहेत.

सध्या भारत तसाच महाराष्ट्रहि अक्षरशः घुसळला जात आहे. मराठी-बिगर मराठी वादातून कटुता व संघर्ष तर निर्माण होणार नाही ना? अशी शंका जाणत्याना येऊ लागली आहे. तर नेणते फक्त चिंतनातच बुडालेले आहेत. एक धागा सुखाचा एवढेच तुणतुणे वाजवीत बसले आहेत ते. उरलेल्या शंभर धाग्यांचे काय? हे झाले संगीताविषयी नि जीवन म्हणजे नादब्रह्मच!

सप्तस्वरानीच बैठक खुलते. रंगते. आम्हीहि ते लक्षात घेऊन या अंकात वाङ्मयाचे विविध प्रकार सादर केले आहेत. प्रारंभी वीणा-वादन सादर केले. त्यानंतरचे लिखाण म्हणजे दिलरुबा, सारंगी, सतार, सरोद, बांसरी ( बेला ) विचित्र-वीणा आणि व्हायोलिन यांच्या सुरावटी. त्यातहि प्रत्येक सुरावट वेगळी असूनहि स्वर मंडळाचा नादध्वनि कर्ण-मधुर, रिझविणारा व हुरहुर निर्माण करणारा असाच साधण्याची पराकाष्ठा केली आहे. ज्याची जशी तब्बेत लागेल तशी त्याला गोडी चाखावयास मिळेल.

अरे हो! सार्वजनिक निवडणुकात जनताजनार्दनाने प्रकट केलेले तांडव-नृत्य तर विलक्षण विलोभनीय! त्यामुळेच बारिक कलाकुसरीला अधिक वाव मिळाला. खटके, मुरके, पल्टे, आलाप-विलाप यांनी रागदारी रंगली. तो रंग अधिक गहिरा व्हावा हीच आस.

'केसरीचे संपादक' श्री. जयवंतराव टिळक यानी लोकमान्यांचा तो अग्रलेख पुनर्मुद्रित करण्यास अनुमति दिली, याबद्दल आम्ही त्यांचे ऋणी आहोत. तसेच मित्रवर्य श्री. ल. ना. गोखले यानी जीर्ण-शीर्ण फाईलीतून त्या लेखाची सही-सही नक्कल मोठ्या आपुलकीने करून


## दीपावली

## दलाल आर्ट स्टुडिओ

४२, केनेडी ब्रीज, मुंबई, ४,
टेलिफोन : ३५७७६५ ★ तारेचा पत्ता DALALART

● **वर्गणीदारास सूचना :** दीपावली व सर्व खास अंकांसह दीपावलीची वार्षिक वर्गणी रु. १२–५० पैसे. द्वैवार्षिक वर्गणी रु. २०; त्रवार्षिक वर्गणी रु.२५ व चार वर्षांची वर्गणी रु. ३२. **परदेशी वार्षिक वर्गणी १६–००**

● **वर्गणी** मनिऑर्डरनें द्यावी. चेक पाठविल्यास तो दलाल आर्ट स्टुडिओच्या नांवें, मुंबई बँकेवरचा असावा. इतर ठिकाणच्या बँकेवरचा असल्यास ७५ पैसे वटणावळ जादा पाठवावी. कोणत्याहि महिन्यापासून वर्गणीदार होता येतें.

● **अंक न पोचल्याच** कळवावयाचें झाल्यास ५ तारखेपर्यंत वाट पाहून मग कळवावें. अंक ऑफिसमध्यें शिल्लक असल्यास जरूर पाठविला जाईल.

● **जाहिरातींचा व्यवहार** हा परस्पर विश्वासाचा असतो. गिऱ्हाईकांच्या इच्छेनुसार जाहिरात छापण्याची कोशिस करण्यांत येते. तरीहि तांत्रिक अडचणीमुळें अगर अन्य कारणामुळें जाहिरातींत कमी–जास्त फरक झाला तर त्याची जबाबदारी व्यवस्थापकावर नाहीं.

● **साहित्याच्या स्वीकृतीचा** निर्णय महिन्याभरांत सामान्यतः कळविला जातो. पोस्टेज असलेलें नापसंत साहित्य परत पाठविलें जातें. पुरेसे पोस्टेज नसल्यास तें निकालांत काढलें जाईल.

● **स्वीकृत अगर इतर साहित्य** गहाळ झालें तर त्याची जबाबदारी व्यवस्थापकावर नाहीं.

संपादक, मालक, मुद्रक व प्रकाशक श्री. **दीनानाथ दलाल** यांनीं स्टेट्स पीपल प्रेस, जन्मभूमि भवन, घोगा स्ट्रीट, फोर्ट, मुंबई १ येथें छापून, दलाल आर्ट स्टुडिओ, ४२ केनेडी ब्रीज, मुंबई ४ येथें प्रसिद्ध केलें.




## मुद्दाम विकत घेणारा वाचक

स. न. वि. वि.

मुद्दाम पत्र लिहिण्याचे कारण मी माझ्या स्नेह्याकडे गेलो असता आपला अंक पहावयास मिळाला. त्यातील मुलाखती व वैशिष्ट्यपूर्ण लेख वाचून आपल्या भारतीय नौदलाबद्दल मन भारावून जाते. आपण घेतलेल्या कष्टाचे व औचित्यपूर्ण निवडलेल्या विषयाचेच हे श्रेय आहे. सदरचा अंक (दीपावली १९६७ फेब्रुवारी) संग्रही ठेवण्यासारखा असून मी तो विकत घेऊन संग्रही ठेवला आहे.

अशा रीतीने वाचकांची अभिरुची उच्च राखण्याचा प्रयत्न आपणाकडून होत आहे. त्याबद्दल धन्यवाद.

आपला,

**पुणे–२ एम. एल. कुळकर्णी**

## नौदल अंक पसंत

स. न. वि. वि.

आपल्या दीपावली मासिकाचा फेब्रुवारी १९६७ चा नौदल विशेषांक अथपासून इतिपर्यंत वाचला.

अंक वैशिष्ट्यपूर्ण व संग्राह्य आहे. भारताच्या नौदलासंबंधी सामान्य माणसाला आजवर जी माहिती नव्हती, ती त्यात आहे.

तसेच भारताच्या प्राचीन इतिहासात नौदलाचे महत्त्व किती होते. शिवकालीन इतिहासात नौदलाची वाढ किती झाली व वगैरेबद्दलची माहिती महत्त्वपूर्ण व अभ्यासनीय आहे. चांगले साहित्य वाचकाना पुरविल्याबद्दल आभार.

आपला नम्र,

**नौपाडा–ठाणे ज्यं. गो. भावे**

## जीवनाचे दोन आगळे पैलू

स. न. वि. वि.

एप्रिल अंकातील कै. पु. मं. लाड यांची वेगळी ओळख चटका लावून जाते. कारण आकाशवाणीच्या कारभारात त्यानी बरीच वादळे उठविली. कधी सरकारचा तर कधी जनतेचा रोषही ओढवून घेतला. पण त्याना जाणणारे त्यांचे सहकारी मात्र अखेरपर्यंत त्यांचे कौतुक करीत होते. आजहि करतात.

दुसरा सर्वस्वी वेगळा परिचय ज्युली ख्रिस्तीचा! सध्या सुखामागे धावत सुटलेल्या सर्वांनाच त्यातून बरेच काही घेता येईल. सध्याच्या भाराभर अंकनिर्मितीतही दीपावलीने दर्जा कायम ठेवल्याबद्दल अभिनंदन.

**बेळगांव रामकृष्ण शिरवईकर**

## हिंदुत्त्वाची बूज आहे तर!

स. न. वि. वि.

मार्चच्या अंकातील दीपमाला फार आवडली.

हिंदू म्हणवून घेणे म्हणजे मरणप्राय दुःखाची गोष्ट असे मानणाऱ्या या काळात स्वा. तात्याराव याना आपण आठवणीने वाहिलेली भावपुष्पे पाहिली नी वाटले की तो अग्नि शांत झालेला मुळीच नाही. त्या निखाऱ्यावर सध्या राख धरली आहे इतकेच.

जनमत कौलावरील परखड विवेचनहि आंधळ्याना डोळस करील. तशाच त्या विलेक्शन भर्कटीकाही बोलक्या, पक्षीय राजकारणाच्या वाभाडे काढणाऱ्या आहेत.

**दादर, मुंबई. जयंत नेरुरकर**

## हसत हसत फटके!

स. न. वि. वि.

मार्चचा हास्य-विनोद विशेषांक मस्तच वाटला. विषयांची निवडही अशी खुबीदार आहे की त्यामुळे वाचकांची नजर खिळून रहाते.

'बाबल्या सरणावरून पळाला,' 'आमची अलिबागची सफर,' 'वासू धंद्यात पडतो' या कथा. हसता हसता बोचकारे काढतात. तर 'वृद्धाश्रम' मनातील एक व्यथेला छेडून जाते.

अश्रूंचे आखात हे रि. अॅड. करमरकर यांचे वेचक स्मृतिकण सलगपणे आठवले की त्यावेळचे ते सागरी युद्ध डोळ्यासमोर उभे राहते. आणि तशा वर्णनाबाबत केवळ अन्य राष्ट्रातील कर्तृत्त्वाच्या गाथा वाचण्यानेच तहान भागवून नेण्यातून थोडीशी का होईना पण सुटका होते, हे मुद्दाम सांगावेसे वाटते.

नभोवाणीवरील जाहिरातीनी श्री. रमेश मंत्री यानी आगामी दैनंदिन जीवनच रेखाटले आहे म्हणाना! पण कायहो त्यात ज्या कंपन्यांची नावे आली आहेत त्यांच्या जाहिरातीचे कंत्राट तर श्री. मंत्री यांनी घेतलेले नाही ना? 'भाग्याची गोष्ट' ही कथा सध्याच्या 'लूप की नो-लूप' या वादंगावर नि त्या योजनेतील गोंधळावर चांगलाच प्रकाश टाकते. टवाळा आवडे विनोद ही जाहिरात सार्थ करूनहि आपण आनंदी फंदीसारखे फटकेहि मारले आहेत.

**नांदेड प्रभाकर शिराढोणकर**

---

**पाठविल्याबद्दल त्यांना द्यावे तेवढे धन्यवाद थोडेच.**

**संगीत अंक म्हटले की श्री. गोपाळकृष्ण भोबे व श्री. जितेंद्र अभिषेकी हे आमचे मित्रद्वय नेहमीच हौसेने साथीला बसतात. त्यांचे आभार म्हणजे त्या निःस्वार्थी साथींचा अपमान! प्रा. सुरेश गजेंद्रगडकर यानीहि परिसंवादाविषयी आस्था दाखविल्याबद्दल त्यांचेही आभारी आहोत.**

**रोशन है मैहफिल शमादानोंसे**
**रंग लाती है शमा कुर्बानीसे**

**—संपादक**










# संगीत शास्त्र

## लो. बाळ गंगाधर टिळक

साहित्य संगीत कला विहीनः ।
साक्षात पशु पुच्छ विषाण हीनः ।

—भर्तृहरि

**आज** हा विषय सुचण्याचे कारण गेल्या आठवड्यात झालेल्या पुणे गायन समाजाचा वार्षिक समारंभ होय. ह्या कष्टमय संसाराचा क्षणभर तरी विसर पडावा व तेणेकरून ऐहिक आयुर्मर्गिक्रमण तेवढ्या अंशाने कमी कंटाळवाणे व्हावे म्हणून जी जी चित्तरंजनाची साधने ईश्वराने मनुष्यास दिली आहेत, त्यात गायन हे प्रधान आहे असे म्हणण्यास हरकत नाही. ढोलके व तुणतुण्याच्या साथीने गाऊन व वाचून श्रमपरिहार करणाऱ्या अडाणी रानटी लोकांपासून तो परमावधीच्या कौशल्याने बीनाच्या किंवा हजारो रुपये खर्चून तयार केलेल्या सहस्र नलिकात्मक ध्वनीयंत्राच्या नशेत तल्लीन होऊन जाणाऱ्या सुधारलेल्या लोकांपर्यंत सर्व प्रकारच्या जनसमूहावर ह्या कलेचा प्रभाव चालतो. मूढ पशुपक्षादिकानाहि आकर्षित करण्याची शक्ती या कलेत आहे, हे गारुड्याच्या पुंगीने डोलणारा सर्प ज्यानी पाहिला असेल किंवा पारध्याच्या वेणूध्वनीला भुलून पाशबद्ध होणारा हरीण ज्यानी ऐकला असेल त्याना माहित आहेच; पण वृक्ष-पाषाणादी अचेतन वस्तूंवरही या गानसरस्वतीचा अंमल चालतो अशी साधारण लोकांची समजूत पूर्वापार चालत आलेली आहे. दीपक रागाने दिवे लागतात व मेघमल्हाराने पाऊस पडतो इ. दंतकथात कदाचित् कवींची अतिशयोक्ति असेल; पण निदान त्यावरून गायनाविषयी लोकांचे अत्युत्कट प्रेम स्पष्ट दिसून येते. ह्या कलेचा उगम केव्हा व कोठे झाला ह्याचा मुळीच ठिकाणा लागत नाही; कारण अतिप्राचीन राष्ट्रांचा आद्येतिहास पाहिला तरी त्या वेळीही हल्लीप्रमाणे किंबहुना हल्लीपेक्षाही अधिक गायनाभिरुचि लोकात असलेली आढळून येते. आणि म्हणूनच प्राणिमात्रांच्या नैसर्गिक नादलुब्धतेमुळे मानव जातीच्या उत्पत्तीबरोबरच संगीताचा उगम झाला असावा असे मानावे लागते. गानविद्या प्रथम स्वर्गातून प्राप्त झाली. इतकेच नाही तर पुढेही ज्यानी या विद्येत प्राविण्य संपादिले त्यास देवत्व प्राप्त झाले, अशा ज्या निरनिराळ्या लोकात कथा आहेत, त्या ह्या कलेच्या पुराणत्वाविषयी साक्ष देतात.

**समाज आणि संगीत यांचे जिवाशिवाचे नाते लो. टिळक यानी पाऊणशे वर्षांपूर्वी विशद केले होते. सन १८९२ मधील ते दूरगामी विचार आजही तितकेच बोधक असल्याने रसिकांना सादर करीत आहोत....**

**—संपादक**

ग्रीक लोकांचा आर्फ्यूस किंवा आपले नारदतुंबरू प्रभृति संगीताचार्यांना देवकोटीत गणले गेले त्याचे बीज हेच असावे. पुराणांतरी अप्सरा गंधर्वांची उत्पत्ती समुद्रमंथनापासून मानली आहे. व ग्रीक, हिब्रु वगैरे इतर प्राचीन राष्ट्रातही अशाच कथा आहेत. त्यावरून प्राचीन काळी ह्या विद्येस किती मान होता हे कळण्यासारखे आहे. परंतु पृथ्वीवरील इतर सर्व लोकांपेक्षा आम्हा भरतखंडवासी आर्यांची गायनप्रियता फारच उत्कट होती, असे अनेक प्रमाणांवरून सिद्ध होते. अतिप्राचीन व आम्हास परमपूज्य असलेल्या वेदत्रयीत आम्ही गानविद्येचा अंतर्भाव केला, इतकेच नाहीतर ऋग्वेदापेक्षाही सामवेदांची योग्यता आमचे प्राचीन ऋषी अधिक मानीत असत, हे "वेदानाम सामवेदोहम्" ह्या भगवद्वचनावरून उघड दिसते. येणेप्रमाणे आर्षब्रह्मविदानीच या विद्येला इतके महत्व दिले तेव्हा अर्थातच तिचा भराभर उत्कर्ष होऊन जेव्हा पृथ्वीवरील इतर सर्व राष्ट्रे अज्ञान-सागरात मग्न झाली होती, अशा वेळीही हिंदुस्थानात तिला बहुतेक पूर्णावस्था प्राप्त झाली होती. कोणताही संस्कृत ग्रंथ उघडला तरी त्यात ह्या विद्येचा उल्लेख नाही असे बहुधा घडावयाचे नाही. ऐहिक,



अनुक्रमणिका

पारमार्थिक कोणतेंही कृत्य करावयाचें असले तरी गायन वादनाचा संबंध ह्या त्यात असावयाचाच. सप्तसंस्थात्मक सोमयागाला ज्याप्रमाणे उद्गात्याचें गाणें व तेंही तालस्वरसहीत असे, अवश्य असे, तसेच अगदी यकश्चित व्यावहारिक कर्मानाही संगीताची जरूर असे. आणि हल्ली देखील उपाध्य नसला, तरी एकवेळ लग्नमुंज उरकेल पण वाजंत्र्यांवाचून चालत नाही अशी आपण स्थिती पहातो. रसिकत्वाविषयी तर हिंदू लोकांची पूर्वीपासून ख्याती आहे. काव्यादिकावर आमचा अतिशय भर व तो इतका कीं, इतिहास, ज्योतिष वगैरे वस्तूस्थितीदर्शक शास्त्रातही आमच्या उच्छृंखल झालेल्या कल्पनाशक्तीने आकांडतांडव करण्याचे सोडले असे नाही. तेंव्हा असल्या रंगेल लोकांनी संगीतासारख्या चित्ताल्हादक विद्येला श्रेष्ठ स्थान द्यावे ह्यात फारसे नवल नाही.

परंतु केवळ मनोरंजन करणे एवढाच या विद्येचा उपयोग असता तर प्राचीन व अर्वाचीन सर्व राष्ट्रातील शहाण्या लोकानी तिच्याकरिता आपल्या कालाचा एवढा अपव्यय केला नसता. सर्व देशांतून व सर्वकाली ह्या विद्येचे जे अतिशय महत्व मानले आहे त्यावरून तिच्यामध्ये काही अलौकिक सामर्थ्य असले पाहिजे हे उघड दिसते. मोझार्ट, बियोव्हन, हॅंमडेल प्रभृति पाश्चात्य गीताचार्यांना जातील तेथे राजासारखा मान मिळत असे तो केवळ तमासगीर या नात्याने कधी मिळाला नसता. व हल्ली प्यॅटीबर्नाटसारख्या नर्तकीच्या पायाशी लाखो रुपयांचे ढीग पडतात त्यातहि काही आंतर हेतु असला पाहिजे. कोणत्याहि सुधारलेल्या लोकांचा इतिहास पाहिला तरी त्यांच्या मानसिक उन्नतीबरोबर ह्या विद्येचा उत्कर्ष व अभिरुचि नेहमी वाढत गेलेली दृष्टीस पडतात व तसेच देशात विपन्नदशा आली म्हणजे तिचा लोप होतो असे नेहमी आढळून येते. आणि थोडासा विचार केला असता ह्याचे कारणही लक्षात येईल. मनुष्याची मानसिक उन्नति म्हणजे त्याच्या चांगल्या मनोवृत्तींचा विकास व दुष्ट विकारांचा उच्छेद करणे होय. व हे घडवून आणण्याची संगीताप्रमाणे दुसऱ्या कोणत्याहि वस्तुत शक्ति नाही हे नित्यानुभवाने सिद्ध झाले आहे. देवळात प्रार्थना करावयाच्या त्या गायनयुक्त केल्याने जसे प्राकृतजनांचे क्षणभर तरी देवाकडे चित्त लागते तसेंच समारंगणी रणवाद्ये वाजल्यावरोबर एकाद्या शिखंडीसही तात्कालिक वीरश्री चढते. हरदासाचा वेदान्त नको असला, तरी टाळकुटयाच्या गळ्याला किंवा पेटीच्या सुराला भुलून शेकडो लोक कीर्तनास जातात व अजामेळाप्रमाणे अन्य निमित्ताने तरी ईश्वरनाम–संकीर्तनाने प्राप्त होणाऱ्या पुण्याचे वाटेकरी होतात हा काय लहानसान फायदा? शिवाय गायनाभिरुचि ही मनुष्याच्या अंतःकरणातील एक नैसर्गिक व उदात्त वृत्ती आहे. तेंव्हा तिची वृद्धी झाल्याने त्याच्या एकंदर स्वभावावर व आचरणावर उदात्त परिणाम झाल्याशिवाय रहाणार नाही.

The man that hath know music in himself,
Nor is not moved with concord of sweet sounds
Is fit for treason, strategeme and spoils.

ही महाकवी शेक्सपियरची उक्ती अनुभवांती अक्षरशः खरी ठरली आहे. ज्याला संगीताची गोडी नाही असा हरीचा लाल आधी सांपडणे विरळा व जर कोणी असेल तर त्याचे अंतःकरण दुर्वासना, कुकल्पना व अत्यंत नीच विचार ह्यानी भरले असले पाहिजे असे म्हणण्यास काही प्रत्यवाय नाही. नादब्रह्मात तल्लीन होऊन क्षणभर साक्षात् स्वात्मसुख अनुभवण्याची ज्याला पात्रता नाही अशा मनुष्याच्या हातून कोणतेंही सत्कृत्य व्हावयाची आशा नको.

सारांश, इतर नैसर्गिक मनोवृत्तीप्रमाणे या गायनाभिरुचीसही चांगले वळण देणे हे सुशिक्षणाचे एक प्रधान अंग आहे. आणि म्हणूनच प्राचीन हिंदुस्थानातल्याप्रमाणे हल्ली युरोप खंडातील एकूण एक सुधारलेल्या देशात ह्या कलेचे थोडेवहुत ज्ञान असणे प्रत्येक सुशिक्षीत मनुष्यास अवश्य मानले जाते. गाणे वजावणे म्हणजे एक हलकट पोटभरूंचा धंदा ही जी आमच्यामध्ये अलीकडे समजूत झालेली आहे ती निःसंशय पूर्वी नव्हती व इतर देशांतूनही नाही. मोठमोठ्या पवित्र कर्मातूनही ज्या विद्येला आद्यस्थान मिळाले, ती आता निर्लज्ज वारयुवतींच्या व आळशी गांजेकसांचे हाती जावी ह्यापरते आमच्या अवनतीचे ढळढळीत प्रमाण दुसरे कोणते सांपडेल? कलावंतीण किंवा कसबीण इत्यादी शब्दांचा यौगिक अर्थ व हल्लीचा अर्थ ह्यामधील अंतर पाहिले म्हणजे हिरा केवळ उकीरड्यावर पडल्याने कसा तुच्छ होतो, हे चांगले ध्यानात येईल. हल्ली ज्याप्रमाणे इंग्लंडात मुलांच्या व मुलींच्या सर्व शाळातून गाणे शिकविले जाते, तसेच पूर्वी हिंदुस्थानातहि प्रत्येक स्त्री सभ्य पुरुषास थोडेवहुत ह्या विद्येचे ज्ञान असणे भूषण समजले जात असे. चारुदत्तासारख्या दारिद्र्याच्या घरातहि वीणादी वाद्ये असल्याचा मृच्छकटिकात उल्लेख आहे. मालविकेसारख्या उच्च कुळातील राजकन्येला गायन-नर्तन शिकविण्यास गणदासाची योजना केली होती! व महाश्वेतेचा वीणाध्वनी तर चंद्रपिडाप्रमाणे कादंबरीरसभराचा घुटका घेणाऱ्या प्रत्येक सहृदय वाचकाच्या कर्णात दुमदुमत असेल. परंतु त्यावेळचा भरभराटीचा काळ नाहीसा झाल्यावर ह्या सर्व गोष्टी आम्ही विसरून गेलो. परचक्राच्या वावटळीवर वावटळी येऊन आदळू लागल्याबरोबर जिवीतरक्षणाच्या विवंचनेने आम्हाला ग्रासले व परकीय अमलाखाली आमच्या सर्व उदात्त वृत्तींचा लोप होऊन वर अवतरणात सांगितल्याप्रमाणे आम्ही केवळ 'पुच्छविषाणहीन' पशू वनलो. दिल्लीपतीचा अंमल कायम झाल्यावर पुन्हा त्या विद्येला थोडीवहुत उर्जित दशा आली पण ही स्थिती फार दिवस

[ पान ५२ वर पहा ]








# कधी काळी हे गीत बंद होता
# कुठे जाशील तूं हीच मनी चिंता



—जितेंद्र अभिषेकी

पूर्व बंगालमधून घरदार, बायकापोरे सर्व काही डोळ्या-समोर खाक झालेले.... ते भोगून भारतात जिवंतपणे आलेला एक सहप्रवासी म्हणाला .... हा देश सोडून कोठे तरी दूरवर निघून जावेसे वाटते .... परंतु दुसऱ्या देशात विवेकानंद वाचायला व लताबाईंचं गाणं ऐका-यला कुठे मिळणार ?

**आजच्या** भारतीय शास्त्रीय संगीतावर जेवढा खाँ. बडेगुलाम अली खाँ व खाँ. अमीरखाँ यांच्या चतुरस्र व्यक्तिमत्वाचा प्रभाव दिसून येतो, तेवढाच किंबहुना त्याहून अधिक प्रभाव, लता मंगेशकर यांचा भारतीय सुगम संगीत, सिने संगीत व सुबद्ध संगीतावर दिसून येतो. मागे एकदा "टाईम" या अमेरिकन साप्ता-हिकाने लताबाईंच्या संगीतावर "अमे-रिकन" पद्धतीने लिहिले होते. आणि दिल्लीला व तेथील काही दुढ्ढाचार्यांना तेव्हापासून "लता मंगेशकर" या खरो-खरच मोठ्या आहेत हे कळून चुकले असे म्हणतात ! परंतु या असल्या गोष्टीं-कडे लताबाईंनी कधी लक्षच दिले नाही. त्याना तेवढा वेळहि नाही किंवा जरुरीही भासली नाही.

व्यथा असो आनन्द असू दे  
प्रकाश किंवा तिमिर असू दे  
वाट दिसो अथवा न दिसू दे ।।  
गात पुढे मज जाणे ।।धृ।।

हे एकमेव ध्येय डोळ्यांपुढे ठेवून "दिदी" गातच राहिली आहे. गेली पंच-वीस वर्षे ! तब्बल पंचवीस वर्षे जे होते ते गेले. जे आले तेहि गेले. ज्यानी आपले स्थान आवर्जून सिद्ध करण्याचा व टिकविण्याचा प्रयत्न केला ते टिकले. परंतु तेहि उपग्रह म्हणून सूर्याच्या आसपास फिरू लागले. जसा काही रामजन्म झाला आणि भारतीय राजेच मांडलिक दिसू लागले. पूर्व बंगालमधून आलेला एक निर्वासित मला भेटला. दोन वर्षांपूर्वी. कलकत्त्याहून जमशेदपूरला जाणाऱ्या गाडीत. फाळ-णीच्या काळात घरदार, बायकापोरे,







सर्व काही डोळ्यांदेखत राखरांगोळी होताना पाहिलेला. भेसूरता, अनिश्चितता, वैताग व करुणा यानी भरलेल्या डोळ्यांचा. सगळ्या भारतावर व इथल्या यच्चयावत गोष्टींवर चिडलेला. बोलता बोलता म्हणाला, हा देश सोडून कुठेतरी दूर दूर निघून जावेसे वाटते. काही वेळ थांबून पुन्हा बोलू लागला. परंतु दुसऱ्या देशात मला विवेकानंद वाचायला व लताबाईंचं गाणं ऐकायला कुठं मिळेल? मला वाटते याहून मोठी बिदागी एकाहि कलावंताला मिळाली नसेल.

तानसेनची मुलगी अन्नपूर्णा हिच्याविषयी अशी दंतकथा सांगितली जाते की, तिचे गाणे ऐकून तानसेनचे पुत्र व शिष्य अवाक् होऊन जात. जणू काही पूर्वजन्मी प्रचंड रियाज केला व या जन्मी फक्त गाण्यासाठीच पुन्हा मानवदेह धारण केला. सरस्वतीचे ऋण फेडण्यासाठी. कै. मास्टर दीनानाथ माझ्या वडिलांकडे म्हणत की, मुलगा झाला तर तो शंकराचार्यासारखा व्हावा, व मुलगी झाल्यास गार्गीप्रमाणे आपल्या बुद्धीने पुरुषांनाहि स्तिमित करणारी असावी एवढीच माझी इच्छा. असे म्हणतात की गार्गी ज्यावेळी गुरूच्या समोर पाठ घेण्यासाठी बसे, त्यावेळी उपनिषदांवरील तिचे भाष्य गुरू स्वत:च नि:शब्द होऊन ऐकत बसे. मरहूम खाँ. अमानतखाँ हे दिदीला शिकवायला येत. एखादा राग शिकविण्यास सुरुवात करीत व पूर्वस्मृति जागृत झाल्यासारखी दिदी आलापी, बोलअंग, उपज, तबीयत यात रमून जाई. अमानतखाँ दिङ्मूढ होऊन पाहात बसत. तालीम संपल्यानंतर हळूच आपल्या खिशातून आणलेला खाऊ दिदीसमोर ठेवीत व त्या छोट्या मुलीकडे डोळे भरून पहात. माझ्या या छोट्याशा जीवनात आजपर्यंत मी बरेच वेगवेगळ्या क्षेत्रातील कलावंत, साहित्यिक, कवि जवळून पाहिले. त्यांचा अभ्यास केला. परंतु यापैकी काही थोड्याच व्यक्तींनी माझ्या मनावर कायमचा ठसा उमटविलेला आहे. अशा व्यक्तींत दिदीचे स्थान पहिले आहे. दिदीसारखी व्यक्ति अनेक शतकांतून एकदाच जन्माला येत असते. दिदीची बुद्धी सर्वग्राही, सर्वव्यापी आणि सव्यसाची. जेवढी संगीतात तेवढीच साहित्यात रमणारी; जशी विज्ञानात तशीच वेदान्तात बुडून जाणारी. नॅट किंग कोल किंवा फ़ैरूज यांची गीतें ऐकताना तल्लीन होणारी दिदी रात्री अपरात्री दिव्याच्या शांत प्रकाशात उशीशेजारी असणारी ज्ञानेश्वरी उघडून ॐ नमोजी आद्या ।। वेदप्रतिपाद्या ।। जयजय स्वसंवेद्या ।। आत्मरूपा ।। या ज्ञानेश्वरांच्या ओवीत देहभान विसरून जाते. देहधर्माचे, तहान भुकेचे भान नसणारी दिदी फक्त तीनच गोष्टी आपल्यापासून कधीही दूर होऊ देत नाही व त्या म्हणजे सूर, ज्ञानेश्वरी आणि शिवरायांचे स्मरण.

गायकाच्या अडचणी गायकच ओळखू शकतो. प्रत्येक गायकाला किंवा गायिकेला संगीतातील काही जागा, काही स्वर, काही तानप्रकार, लयप्रकार किंवा एखादा विशिष्ट गायनप्रकार योग्य अशा रियाजानेच साध्य करून घ्यावा लागतो. हा रियाज करूनहि त्या गोष्टी साध्य होतीलच, हे हमखास कोणताहि गवयी किंवा गायिका सांगू शकत नाही. गायकाच्या जीवनातील ही शल्ये त्याला सातत्याने अस्वस्थ करीत असतात. परंतु दिदीच्या बाबतीतले अद्वितीयत्व इथेच दिसून येते. तिला कोणताहि गायन प्रकार असाध्य नाही. संगीतातील कोणतीही गोष्ट तिला असाध्य वाटल्याचे मला तरी दिसून आले नाही. एका सिनेमासाठी शास्त्रीय संगीताचा प्रामुख्याने उपयोग करून घेण्यात येत होता आणि त्यासाठी शाम चुरासी घराण्यातील खाँ. नजाकत व सलामत अली यांच्याकडून व लताबाईंकडून ललत, मारवा व इतर काही रागांचे ध्वनिमुद्रण करून घेण्याचे ठरले. इतर कामामुळे लताबाईंना त्यादिवशी वेळ नव्हता म्हणून लताबाईंनी निर्मात्याना अशी विनंति केली की, खाँसाहेबांचे गाणे ते गातील, त्या

संगीत राजकीय जल्लोष !



रात्र काळी । 'घडा'हि काळा
भविष्यहि माझे । काळे हो काय ?

तऱ्हेने ध्वनिमुद्रित करा व नंतर ते ऐकून पुढील भाग मी गाईन." मी त्यावेळी दिदीबरोबर होतो. नजाकत व सलामत अलींनी बेफाम तय्यारीने गायलेला तो ललत व मारवा ध्वनिमुद्रित झालेला ऐकला व मला मनस्वी वाटले की दिदीने "या तय्यार गायकांच्या" बरोबर गाण्याचे उगाच मान्य केले. तसे मी दिदीला बोलूनदेखील दाखविले. दिदीने काहीच उत्तर दिले नाही. दिदीच्या खोलीत, श्रीकृष्ण अर्जुनाला भगवद्गीता सांगताहेत त्या प्रसंगाचा, हस्तिदंती पुतळा आहे. त्याच्या शेजारीच दिदी उभी होती. मला अजून आठवते की दिदी, माझ्या प्रश्नाचे उत्तर म्हणून अर्जुनाच्या हातातील धनुष्यबाणावरून हात फिरवीत हंसली होती; आणि त्याचे प्रत्यंतर मला पुढील दोन दिवसातच आले. हेडफोन्स लाऊन नजाकत–सलामत अलींचे गाणे ऐकता ऐकता दिदीने त्याना त्यांच्याच गायन प्रकारात तोडीस तोड





अनुक्रमणिका

असल्याप्रमाणे जवाव दिले होते. गायकाच्या आयुष्यात काही क्षण असे असतात की, अशावेळी गाणाराहि कृतकृत्य व कृतार्थ झालेला असतो व त्याच्याबरोबर श्रोताहि. असे क्षण ज्यांच्या नशिवी आले ते गायक व गायिकाहि थोर आणि अशा गायक-गायिकांचा सहवास मिळालेला श्रोताहि भाग्यवान् !

एका ऋषीची गोष्ट सांगतात की हा ऋषी जिथे आपले पाय विश्रांतीसाठी सोडीत असे, त्या ठिकाणी शिवलिंग निर्माण होई. दिदीने ज्या ज्या संगीत दिग्दर्शकाना आश्रयासाठी आपला आवाज दिला, त्यांच्या संगीताचेहि असेच झाले आहे, असे म्हटल्यास अतिशयोक्ती होणार नाही. दिदीला मात्र याचा तिळमात्र अभिमान नाही. उलट इतर गायिका गाताना आपले अनुकरण करून टीपकागद होण्याचा प्रयत्न करतात, याचे तिला दुःख होते. इतर गायिकानी आपल्या आवाजधर्मानुसार आपापली गायन पद्धती निर्माण करावी. आपले स्वतंत्र स्थान निर्माण करावे अशीच तिची मनापासून इच्छा असते.

दिदीचे गायन हे सर्व काही दैवी आहे असे म्हणून, त्यातील प्रयत्नांचा भाग कमी लेखण्याचा बऱ्याच लोकांक ून प्रयत्न केला जातो. आणि हे चूक आहे असे मला आवर्जून सांगावेसे वाटते. आज जे दिदीने साध्य करून घेतले आहे, त्यामागे प्रदीर्घ चिंतन, सुरासुराचा अभ्यास, काव्याचा, उर्दू व हिंदी भाषेचा अभ्यास उभा आहे. १९४५ नंतर गायलेल्या प्रत्येक गाण्यातून दिदीची संगीतातली पूर्णत्वाच्या दिशेने चालू असलेली वाटचाल सातत्याने दिसून येते. दिदीतील कलावंताची वाढत जाणारी प्रतिकृती दिसून येते.

एक दिवस सकाळीच मी दिदीच्या घरी वसलो होतो. संगीतावर व नवीन पुढे येणाऱ्या गायक-गायिकांवर गोष्टी चालल्या होत्या. दिदीने नेहमीप्रमाणे बऱ्याच गायक गायिकांचे कौतुक केले. तोंडभरून स्तुती केली. कुणाचे काय आवडते हेहि मोठ्या चिकित्सक तऱ्हेने ती सांगत होती. एवढ्या मोठ्या कलावंताची इतर गायक-गायिकानाहि मोठे म्हणण्याची "नीरक्षीर" वृत्ती आणि ती देखील मनापासून; मी आपला ऐकत वसलो होतो. आणि एवढ्यात सिलोन रेडियोवरून एक भली मोठी नांवांची यादी उद्घोषणा करणाऱ्या माणसाने सांगितली. कन्याकुमारीपासून बद्रीनाथपर्यंत पसरलेल्या भारतातील कित्येक गांवचे हे लोक. यादी संपली आणि "ओ सजना बरखा बहार आई" हे दिदीचे गाणे सुरू झाले. समोर टेबलावर दिदीच्या हजारो चाहत्यांची आलेली पत्रे इतस्ततः विखुरलेली होती. मी म्हणालो "यापेक्षा जीवनातील कृतार्थता दुसरी कोणती ?" दिदीच्या तोंडून हलकेच उत्तर आले "फार प्रेम करतात हे सगळे लोक माझ्या गाण्यावर" आणि दिदीने एक लांब सुस्कारा टाकला. खिडकीतून वर येणाऱ्या सूर्याचे किरण पसरत चालले होते. त्या सूर्य किरणांकडे दिदी अस्वस्थ होऊन पहात होती. मी समोर पसरलेली भाराभर फॅन्स्ची पत्रे गोळा केली आणि त्यांच्याकडे पहात म्हणालो,

**"कधी काळी हे गीत बंद होता**
**कुठे जाशिल तू हीच मनी चिंता ।।"**

• • •













BENSONS/NGB-101B MAR

# तिचा लग्न समारंभ आम्ही आनंदानें पार पाडला

खरोखरच आम्हाला पुष्कळ आनंद झाला. आम्हाला कल्पना नव्हती कीं आम्ही एवढ्या कमी उत्पन्नांत सीतेचं लग्न इतक्या थाटामाटांत करू शकूं.

या गोष्टीला पुष्कळ वर्षें झाली. आतां आम्हाला आठवत सुद्धा नाहीं कीं नॅशनल ॲन्ड ग्रिन्डलेज बँकमध्यें थोडें पैसें बचत करण्याची सल्ला कोणी दिला. आणि आम्हाला सांगण्यांत जरा पण संकोच वाटत नाही कीं बँकेत पाऊल ठेवण्याची पण आमची हिंमत नव्हती आम्हाला वाटत होते कीं नॅशनल ॲन्ड ग्रिन्डलेज ही मोठ्या माणसांची मोठी बँक आहे.



वाटत होते, आम्हाला ते हसतील काय ? एवढी लहान रक्कम ते स्वीकारतील काय ? परंतु तुम्हाला आश्चर्य वाटेल.

"त्यांनी सांगितले तुम्ही पांच रुपयांनी सुरुवात केली तरी आम्हाला आनंदच होईल" आणि खरोखरचं त्यांच्याकडें सेव्हिंग्स बँक अकाउंट उघडण्याकरितां फक्त तितक्याचीच आवश्यकता आहे. आणि एवढेंच नव्हें तर प्रत्येक वर्षी ४% व्याज मिळून तुमचे पैसे वाढत असतात फक्त आपल्याला बँकेत गेले पाहिजे. योग्य ती सेवा देण्यांस ते तत्पर आहेत एवढ्यानेंच जर कोणती बँक चांगली समजली जात असेल तर ते सर्व इयें आढळेल. नॅशनल ॲन्ड ग्रिन्डलेज मध्यें जा आणि स्वता अनुभवा.

*तुम्ही आणि नॅशनल ॲन्ड ग्रिन्डलेज खरोखरचें मित्र होऊ शकतां*

## नॅशनल अन्ड ग्रिन्डलेज बँक लिमिटेड

संयुक्त राज्यांत संस्थापित ० सभासदांची मर्यादित ० ॲसोशिएटेड बँक्स : लॉयड्स बँक लिमिटेड ० नॅशनल प्रॉव्हिन्शियल बँक लिमिटेड

**मुंबईतील शाखा :**—९०, महात्मा गांधी रोड, २७०/२७२, डॉ. दादाभाई नवरोजी रोड, (लाइडस ब्रँच) ; मिंट रोड, (मिंट रोड आणि सर फिरोजशाह महेता रोडच्या कोपऱ्यावर) ; २१/२९, प्रिन्सेस स्ट्रीट, (लाइडस ब्रँच) ; ११७/११९, काझि सैयद स्ट्रीट, मांडवी ; ६५एफ, लिंकिंग रोड, सान्ता क्रुझ : ५७४, गोआलिया टँक रोड, कम्बाला हिल ; शिवाजी मंदिर, न. चि. केळकर रोड, दादर, (सेफ डिपॉझिट लॉकर्स) ; २४बि, [illegible], भायखळा. **ठाणें :**—आग्रा रोड, कोलबाद रोड, (कॅसल मिल्सच्या जवळ).

## एक संगीतमय प्रदीर्घ प्रीतिकथा




-गोपाळकृष्ण भोबे



**देह स्वरमय झाला कीं शब्द आपोआप ओठावर येतात. नसानसात लय संचारली कीं काव्यपंक्ती आकार धरू लागतात. ही संगीत विद्याच अशी आहे सोणा की, माणसाने आपली पंचेंद्रिये तिच्यात विलीन करून टाकली पाहिजेत....**

"प्यारे वलमा, मोरे। अब तुम
नेक ना लीनी मोरी खवरिया ॥"

......सोणाच्या मांडीवर डोळे मिटून धुंदपणे गुणगुणत पडलेल्या शोरीने आपली सुखावलेली सुस्त नजर तिच्या नजरेला भिडविली आणि चिजेचा चरण संपताना झरंकन् भिंगरीसारखी एक अवघड तान घेतली. गोमतीच्या किनाऱ्यावरील गर्द पर्णराजी वाऱ्याच्या झुळकीने शहारावी तशी शहारली.

"हाय. हाय, कितनी सुहानी बंदिश ! सोणा किती बुद्धिमान होते ग आपले पूर्वज. भूपाली, भूप, देशकार, विभास, रेवा या सर्व रागांच्या आरोह-अवरोहांची संख्या सारखी. पण वेगवेगळी स्वरसंगती जोडून त्यांची त्यानी निरनिराळी रूपं केली.. आता हाच 'जैत' बघ. दोन तीन स्वरांचा आधार सोडून हा एखाद्या ढगासारखा अधांतरी तरंगणारा; पण तसं असूनही स्वतंत्र अस्तित्वाचा. ही निर्मिती पाहून असं वाटतं सोणा की, याचा शोध घेता घेता बेफाम व्हावं नि सारं सारं विसरून त्या नादसमुद्रात बुडून जावं. आता या क्षणी मला काय वाटतं सांगू ?"

"सांग !"

"असं हे चिंतन चालू असताना, धुंदपणे तुझ्या मांडीवर सुखाने पहुडलो असताना अशा स्थितीतच माझ्या प्राणाचं पाखरू उडून जावं !"

"शी शी शी ! असं अभद्र बोलू नकोस शोरी ! अरे किती किती आनंदात आहे मी यावेळी. एका आठवड्याच्या आतच आता सावन लागेल. आमरस पिऊन मत्त झालेले हे कोकिळ बघ कसे जोड्याजोड्याने भराऱ्या मारीत आहेत. सायंकाळची ही मदमत्त वेळ. निळ्या काळ्या आकाशाखालचा हा गोमतीचा किनारा. आणखी थोड्याच वेळात एक एक सितारा आपआपली खिडकी उघडून बाहेर डोकावेल. मग वारा सुटेल. काळे काळे ढग इकडून तिकडून सैरावैरा धावतील. मग ते सितारे घाबरून आपआपल्या खिडक्या बंद करून घेतील. मिया, काल याच वेळी माझ्यासमोर वसला असताना आकाशातले वदलते रंग पाहून तू नवा टप्पा रचलास....हाय हाय ! आज दिवसभर माझ्या ओठावर त्या ओळी ल्हाया फुरफुराव्यात तशा फुरफुरत होत्या. पहिल्या एकाच कडव्यात 'गौडमल्हार' कुतुबमिनारासारखा उभा राहिला. आहाहाहा !...."नजरा नही आंदावे ! मिया वेखणदा मानु चाव घनैरे....!" किती सुरेख, किती गोड. निखाद तो ऐसी आती है की जैसी छिलके हुवे पके आम की फाक....भेटीसाठी जीव तळमळला, डोळे ताणताणून दुखायला लागले; पण मिया, अजून तुझं दर्शन नाही.

आणि 'चाव घनैरे' म्हटल्यानंतर तुझ्या गळ्यातून एका दमात येणारी ती खटक्यांची तान....मी सांगते मिया, टाप लागली नाही कुणाच्या गळ्याची तेवढी ती जागा घ्यायची. मिया, शोरी, अरे किती भाग्यवान मी. पूर्वजन्मीचं माझं संचित थोर म्हणून तू मला लाभलास. असं हे रम्य वातावरण, तू माझ्या मांडीवर डोकं ठेवून सुखात पहुडलेला आहेस, मीही स्वप्नातलं सुख प्रत्यक्षात अनुभवते आहे, आणि अशा वेळी तुझ्या तोंडून अभद्र शब्द यावेत ? छे छे, मिया, या वेळी तुझ्या तोंडून एकेही अभद्र शब्द ऐकायची इच्छा नाही माझी ! कालचा तो टप्पा पुरा कर मिया. हं..."नजरा नहीं आंदावे मिया....!"

"दैवे या लाख सोणाची। मज अवचित पडली गांठी। कविता इजसंगे रंगा आली। नाना रसल्याली।....सोणा, खरंच का माझ्यावर तुझं इतकं प्रेम आहे ? कुठचा कोण मी; कुठून कुठे गेलो; कुठे पोहोचलो; करायला गेलो काय नि घडलं काय ! सारंच विचित्र. माझ्या वालिदानी वजनदार ध्रुपदं रचण्यात आयुष्य घालवलं, त्यांनी सुंदर सुंदर ख्याल रचले आणि मी हलके फुलके टप्पे रचतो आहे. आश्चर्याची गोष्ट अशी सोणा की, संगीताची सारी दुनिया माझी कविता गाते आहे"






"मला रचता येईल का रे अशी कविता?"

"कां येणार नाही? सारं सारं विसरून सुरात बुडून राहिलं पाहिजे, सोणा. देह स्वरमय झाला की शब्द आपोआप ओठावर येतात. नसानसात लय संचारली की, काव्यपंक्ती आकार धरू लागतात. ही संगीत विद्याच अशी आहे सोणा, की माणसाने आपली पंचेंद्रियें तिच्यात विलीन करून टाकली पाहिजेत. अष्टौप्रहर एकच निदिध्यास हवा. भूक, तहान, विकार सारे सारे सुरात सामावलेले असले पाहिजेत, म्हणजे मग त्या सिद्धीचा एक लहानसा अंश आपल्याला वश होतो. तुला ते शक्य होणार नाही, सोणा. व्यवहाराच्या तालात तुझी पावलं रांगली. त्यातच तू मोठी झालीस. तुझ्या गळ्यात कुदरतीनं सुंदर सूर ठेवलेला आहे. आणि त्या सुंदर स्वरासारखंच लावण्यही तुला लाभलेलं आहे.



तू माझ्यावर प्रेम करतेस हे माझं भाग्य; पण खरं सांगायचं सोणा, म्हणजे लावण्यानं दरिद्र्याची संगत जोडणं हा आत्मघाताचा मार्ग आहे. लखनौच्या अमीर रईसांचे बुभुक्षित डोळे तुझ्या कोठीच्या परिसराभोवती घोटाळू लागलेले आहेत. तू मनात आणशील तर हिऱ्या-मोत्यांची तोरणं तुझ्या कोठीच्या दारा-खिडक्यांना लटकतील. असल्या या भणंग फंदात पडण्यापेक्षा सोणा, तू व्यवहार श्रेष्ठ मानून माझ्यापासून दूर हो आणि आपलं कल्याण करून घे....!"

तो असे काही बोलू लागला की, ती मान खाली घालून गप्प राही. तिच्या लांब पापण्यात पाणी साठे, आणि ते तिच्या गुलाबी गालावरून एकसारखे ओघळू लागे. आजही तिच्या डोळ्यातून अश्रुधारा वहात राहिल्या. पण त्याच्या तोंडावर मध्येच हात ठेवून ती म्हणाली—

"पण मला एक सांग मिया, तुला कुणी शिकविली असली ही व्यवहारी बोलणी?"

"माझ्या परिस्थितीनं. परिस्थितीनं मी एका टोळीवाल्यांच्या हातात सांपडलो!"

"अमा....! टोळीवाल्यांच्या? म्हणजे वाळवंटात, खिंडीत लुटमार करणाऱ्यांच्या?"

"हो. म्हटलं तर तसंच!"

"तो कसा काय?"

"मी चार वर्षांचा असल्यापासून माझ्या अब्बाजाननी मला तालीम द्यायला सुरुवात केली. माझी आई माझ्या लहानपणीच वारली होती. अब्बाजाननी मला दुसरी आई आणली होती. या दुसऱ्या आईचं तोंड मी कधी पाहिलं नाही. नि तिच्याशी कधी बोललोही नाही. अब्बाजानचं माझ्यावर प्रेम खरं पण त्यांचा स्वभाव अतिशय तापट होता. जराशी आगळीक झाली की, ते आकाशपाताळ एक करायचे. वयाच्या आठव्या वर्षापासून त्यानी मला 'चिल्ला' करायला लावलं. चिल्ला करणं म्हणजे एकसारखी एकाग्रतेनं साधना करणं. माळ्यावरच्या एका लहानशा अडगळीच्या खोलीत मी चिल्ल्याला बसायचा. या खोलीत सगळीकडे अंधाराचं साम्राज्य. घटकाभरदेखील मला तिथं बसवत नव्हतं."

"अब्बाजान मला पहाटेच्या सुमाराला या माळ्यावर चढवायचे. आणि दिवसभर माझं खाणं पिणं सारं काही तिथंच चालायचं. मला तिथून खाली उतरता येत नव्हतं; पण जेव्हा ते यायला लागलं तेव्हा अब्बाजान काही कामानिमित्त बाहेर गेल्याची चाहूल घेऊन, माळ्याच्या एका भगदाडातून खाली उतरून मी बाहेर पळून जाऊ लागलो. अब्बाजानच्या हे लक्षात

यायला वेळ लागला नाही. त्यानी पाळत ठेवून मला पकडलं आणि अंगाची सालटी निघेपर्यंत वेदम मार दिला; परंतु पळून जायची संवय लागलेलं माझं मन स्वस्थ वसेना आणि तो ध्रुपदी चिल्लाही मला आवडेना."

"घरी येणाऱ्या निरनिराळ्या गवय्यावजवय्यांची गाणी वजावणी माझ्या नित्य कानावर पडत होती. माझा गळा जन्मतःच इतका हलका की, एक स्वर लावताना त्याला दहा स्वरांची कुसर सहज लागे. अब्बाजान वाहवा देत पण त्याना ते अजिवात आवडत नसे. घरंदाज गायकाला असा गळा असून चालत नाही असं ते सांगत. मजकडून सरळ गाण्याची अपेक्षा वारंवार करीत. चूक झाली तर असा मार देत की, त्यांच्या हातून मला सोडविणारं कुणीही नसल्यानं मुकाट्यानं तो मार सहन करण्याखेरीज गत्यंतर नसे. आणि आता तर ध्रुपद गायकी संपून ख्याल गायकीच्या चिल्ल्याची वेळा मध्यरात्रीपासून सुरू झाली. मध्यरात्रीपासून सकाळी आठ वाजेपर्यंत तब्बल आठ घंटे !"

"मी वैतागलो होतो. घरातून पळून जावं असं मला सारखं वाटत होतं. एक दिवस मी निश्चय केला माळ्यावरून उतरलो. सगळीकडे सामसूम पाहून धूम पळालो. गावाबाहेरील कबरस्थानात एका मोठ्या कबरीच्या आड वराच वेळ दडून वसलो. चांदणं पिठासारखं पडलं होतं. त्या मंद प्रकाशात कबरीला एक लहानसा दरवाजा असल्याचं दिसलं मला. मी त्या दरवाजाजवळ जाऊन तो जोरानं ढकलला. तो उघडेना. तेव्हा त्याच्यावर रागाने एकदोन उगाच थापा मारल्या. आणि त्याला रेलून उभा राहिलो. काही वेळाने तो दरवाजा आतून कुणीतरी उघडत असल्याचा मला भास झाला. मी विस्मित होऊन पाहात राहिलो

**संगीत राजकीय जल्लोष !**



थकलो मी आता । बडवुन ढोल
पृथ्वी आहे गोल । पांडुरंगा ॥

तोच दरवाजा सताड उघडून एक काळा बुरखाधारी व्यक्ती झटकन् वाहेर आली आणि तिनं माझ्या तोंडावर हात ठेवून मला कवेत ओढून घेतलं नि ती मला आत घेऊन गेली. आतल्या गुडूप काळोखात ती व्यक्ती काही पायऱ्या उतरली नि खोलीसारख्या दिसणाऱ्या एका खोदलेल्या जागी तिनं मला मोकळा केलं. मला एका खोक्यावर जवरीनं वसवून तिनं झटकन् बुरखा काढला. एक उघडावंब फकीरासारखा, फाटक्या अंगाचा पण लालबुंद डोळ्यांचा तो माणूस माझ्याकडे रोखून पाहात म्हणाला–

"जराही आवाज करशील तर तुझे तुकडे तुकडे करून इथल्या इथं गाडून टाकीन तुला. वोल, कां आलास इथं ? कुणी पाठवलं तुला? नांव काय तुझं? तू कुठचा कोण? वोल वोल लवकर?"

माझी तर वोबडीच वळली होती; पण तशा स्थितीत मी त्याला उत्तर दिलं–मी... मी... मी गुलाम नबी ! मिर्जा गुलाम रसूल माझे अब्बाजान !"

"गवय्या गुलाम रसूल ?"

"हां जी !"

"मग तू इथं अशा अपरात्री कां आलास ?"

मग मी त्याला माझी सारी हकिकत सांगितली आणि त्याचे पाय धरून म्हटलं–कृपा करून मला आता घरी परत पाठवू नका. अब्बाजान मला जिवंत ठेवणार नाहीत. काहीही करा पण मला वांचवा. तुम्ही मला इथन घालवून दिलंत तर कुठंतरी जाऊन मी जीव देईन !"

माझी हकिकत ऐकून तो भयंकर दिसणारा माणूस खो खो हंसला. म्हणाला–

"पोरा, आता इथून परत जायची गोष्टच सोड. तुला परत पाठवणं म्हणजे एक महान धोका पत्करणं होय. तुला मी परत तर पाठवणारच नाही, पण यापुढे तुला आपल्या या गावाचं दर्शनदेखील होणार नाही. दिवस उजाडायच्या आत तुला माझ्यावरोवर हे गाव सोडावं लागेल !" एवढं बोलून तो माणूस वराच काळोख असलेल्या एका कोपऱ्यात गेला आणि तिथून एक गाठोडं आणि एक लांबट पेटी घेऊन आला. लांबडच्या पेटीतून त्याने सूरसिंगारसारखं एक छोटसं तंतुवाद्य बाहेर काढून ते स्वरात जुळवून माझ्या हातात दिलं व गाठोडं सोडून तबलाडग्गा बाहेर काढला.

"तुला तुझ्या बापानं लहानपणापासून गाणं शिकविलं आहे म्हणतोस ? मग गा बघू एखादी चीज. हं छेड ते तंतुवाद्य. मी तुला तबल्याची साथ करतो. हां छेडो; खाली तारों पर उंगली चलाव !"

मी आश्चर्यानं अगदी थक्क झालो होतो. कबरीतील ती भुयारासारखी जागा; भयंकर दिसणारा तो माणूस; त्याच्या जवळचा संगीताचा साज; झटकन् तारा सुरात लावण्याचं त्याचं कसब... मजजवळच्या तंतुवाद्याच्या सुरावर त्यानं तबला सुरात लावून त्यावर बायाच्या संगतीनं 'दृगुतिग्धा' अशी सुंदर थाप मारली






की, तशी थाप मी पूर्वी क्वचितच ऐकली असेल. बेभानपणे नकळतच माझ्या तोंडून दाद गेली 'वाहवा!' त्यानी माझ्याकडे चमकून पाहिलं. त्यांच्या ओठावर स्मितरेखा उमटली. म्हणाले–

"सही बात है कि तू गवय्ये के खानदान का लडका है ! अच्छा अब चलो ! "

गाणं सुरुवात करायचा त्यानी मला इशारा केला. आणि आश्चर्य, भीति, अद्भुतता यामुळे भांबावन गेलेला मी...त्या तंताच्या सुरात मी आकार मिसळला आणि अब्बाजाननी तालमीत नुकताच पुरा केलेला दरबारी कानड्याचा ख्याल सुरू केला–

"हजरत तोरे कमान झूके बलबल जैये री"

घंटाभर मी दरबारी गात होतो. तो माणूस रंगून, डोळे मिटून साथ करीत होता. तुला सांगतो सोणा, तबल्याची तशी साथ मी फिरून कधी अनुभवली नाही. किती नरम आणि गोड हात. दाया आणि बाया यांचा असा सुखसंवाद होत होता की, जणू दोन आत्म्यांचे मीलन झालेल्या प्रियकर प्रेयसीचे आपसातले हितगूजच ! त्याने हात करून मला थांबायला सांगितलं.

"बस्स, बहुत अच्छे ! बेटा, तेरे गले में कुदरत ने एक ऐसी चीज रखी है की जों खानदानी गवय्यों में नहीं पायी जाती. और मिलना भी असंभव है. मगर तेरे वालिद ने तुझे ऐसा रास्ता दिखाया है की जिससे तुझे सफलता कभी भी नहीं मिल सकेगी. मैं तुझे इस तरह तैय्यार करूंगा कि हिंदुस्थान के कोने कोने मे तेरा नाम हो जायगा ! अब तू सो जा. थोडीसी देर मे हमें यहांसे निकलना है."

"त्या माणसाचे बोलणे ऐकन मी थक्क झालो होतो. त्याने मला बेटा असं संबोधून माझ्या मनातील भीति दूर केली होती 'मैं तुझे इस तरह तैयार करूंगा...इस तैरह तयार करूंगा की .....! त्याचे ते शब्द आठवत जिवाची मुटकळी करून त्या पेटीवरच मी झोपलो."

☆ ☆

"मला अर्धवट जाग आली ती एकसारख्या गचक्यानी. डोळे किलकिले करून मी पाहिले तो दिवस चांगलाच वर आला होता. उन्हाची एक तिरीप माझ्या डोळ्यावर येत होती; पण गचकणं थांबलं नव्हतं. साफ डोळे उघडून मी उठून बसलो. माझ्या अंगावर मखमलीचं उंची पांघरूण होतं, ते मी दूर केलं. पाहतो तो बंदुकधारी घोडेस्वारांचा आणि उंटस्वारांचा एक तांडाच्या तांडा माझ्या आजूबाजूने चाललेला. माझ्या बाजूला कबरीतला तो माणूस डोळे मिटून ध्यानस्थ बसला होता. दोन उमद्या घोड्यांच्या गाडीवजा माचावर आमची बैठक मांडली होती. बैठक कसली, सरदार दरकदारांजवळ कदाचित् नसतील अशा सुंदर लोडातकियांची आणि रुजाम्याची बिछायत होती ती. असल्या बिछायतीवर मी आयुष्यात पहिल्यानेच झोपलो होतो. हे मी सारं जागेपणी पाहातो आहे की, स्वप्नात हे मला कळेना.

हिरवी गर्द झाडी असलेल्या पहाडी वाटेतून तांडा चाललेला होता. ध्यानस्थ माणसाने डोळे उघडले. मला उठलेला पाहून विचारले – "बेटा, निंद पुरी हो गयी ?"

आतापर्यंत कित्येक वेळा बेटा, बेटा म्हणून पुकारणाऱ्या त्या माणसाबद्दल माझ्या मनात नकळत एक अनामिक नाते उत्पन्न झाले. आणि त्याना मी उत्तर दिले–"हां अब्बाजान !" त्यांचा चेहरा कसल्यातरी समाधानाने चमकला. लगेच त्यानी हुकूम दिला,

"ठहरो, नमाज और नास्ता यहीं हो जाय !"

"दिवस मावळल्यावर एका दुर्गम जागी उभारलेल्या राहुट्यात मध्यभागी बैठक घातली गेली. सारे घोडेस्वार, उंटस्वार तिथे येऊन कडे करून बसले. बऱ्याच जणांजवळ कछुव्यासारखी तंतुवाद्ये होती. त्यातील एक प्रमुख अब्बाजानजवळ येऊन म्हणाला–"साई, तशरीफ लाइयेगा !" आम्ही येऊन मैफलीत बसलो. कुणीतरी एक सुरेख ढोलक अब्बाजानजवळ दिलं. कछुव्यातून स्वर झंकारले. आणि सोणा, तुला काय सांगू त्यापूर्वी कधीही न ऐकलेलं असं कर्णमधुर सुंदर गीतगायन मी त्या रात्री ऐकलं."

"खेमटा, दादरा, दिपचंदी, पंजाबी, त्रिताला अशा धारदार ठेक्यात माझे अब्बाजान काळजाला गुदगुल्या व्हाव्यात अशी बहारदार साथ करीत होते. नजर पोहोचू शकत नव्हती असा एकेकाचा फिरता गळा. उंच, पातळ, पहाडी आवाजातून निघालेली एकेक मुरकी, हरकत लाख मोलाची. माझ्या दृष्टीसमोर स्वरांच्या चांदण्या चमचमत होत्या. त्यातील एकाचं गीत संपल्यावर अब्बाजाननी मला विचारलं–

"बेटा, यहां कुछ गा सकते हो ?"

मी मान हालवून नकार दिला. माझं हृदय, डोळे आणि सारी इंद्रिये भरून आली होती. माझ्या तोंडून शब्द फुटत नव्हता.

☆ ☆

"जवळ जवळ आठ वर्षे माझे आयुष्य त्या टोळीवाल्यांच्या संगतीत गेलं. चार चार, आठ आठ दिवस त्या लोकांचा पत्ता नसायचा. ते लोक काय करीत, कुठे गायब होत मला काही पत्ता नव्हता. मुक्काम हलला की अब्बाजानबरोबर जायचं माझं काम. ते लोक त्याना सांई म्हणायचे. त्यांची आज्ञा पाळायचे. त्याना काहीही कमी पडू देत नसत. त्यांच्या सेवेत कसूर होऊ नये याची दक्षता घेत. आणि त्यांच्या बरोबरीनं मलाही मान द्यायचे. त्यानीच माझं नांव शोरी ठेवलं. अब्बाजान मजकडून रोज रियाज करून घ्यायचे. फावल्या वेळात ते गीतं रचीत असत. रचलेली कडवी मला पढवीत मग मी ती रात्री बैठकीत म्हणून दाखवी. ही नवी गीतं ते लोक पाठ करीत.

या आठ वर्षात स्त्रीचं दर्शन मला घडलं नाही. अब्बाजान माझे आई होते, वडीलही होते. माझी सर्व काळजी त्यानी वाहिली. त्यांचं घर कुठं होतं, दार कुठं होतं त्यानी मला कधी कधी सांगितलं नाही. अधून मधून अस्वस्थ होऊन ते फेऱ्या घालीत, जग रहाटी-संबंधी अतिशय कडवेपणाने बोलत. माणसं किती वाईट असतात आणि बरी असतात याची चर्चा करीत. स्त्री, प्यार, व्यवहार शरीअत, शरारत, शराफत यासंबंधी बोलायला लागले म्हणजे दिवसभर बोलत राहात. नाना उदाहरणे देत आपलं म्हणणं पटवीत असत. लोक तन्मय होऊन ऐकत. एखाद्या वेळी माझ्याकडे पाहात म्हणत – "लडका होनहार है, इस को मैं अपने गद्दी पर बिठाऊंगा !"

"आणि एका दिवशी एकाएकी मोठा गोंधळ झाला. हलकल्लोळ माजला. काय झालं मला कळेना. अलीकडून पलीकडून बंदुकांचे ठो ठो आवाज, किंकाळ्या, घोड्यांचे खिंकाळणे, भागो दौडोचा आक्रोश आणि काय काय ! अब्बाजान सकाळीच कुठे बाहेर गेले होते. मी राहुटीच्या आड उभा राहून भयभीत नजरेने चोहीकडे पाहात होतो. तोच काही पेटलेले बाण आमच्या राहुट्यांवर पडले. राहुट्याना आग लागली. कुठं धावावं मला कळेना. माझं तर काळीज उडालं. अब्बाजान, अब्बाजान अशा हाका मी मारू लागलो. आसपास कुणीही दिसेना. इतक्यात आमच्यातला एक घोडेस्वार माझ्या रोखाने आला. त्यानं पटकन् उचलून मला आपल्या घोड्यावर घेतलं, आणि वेगाने घोडा पिटाळला. "अब्बाजान कुठं आहेत ? तू मला घेऊन कुठं चालला आहेस ?" मी त्याला प्रश्न करीत होतो पण तो काहीही उत्तर देत नव्हता. उजव्या हातात बंदूक सावरत आणि डाव्या हाताने लगामाला हिसके देत तो एकसारखा घोडा पिटाळण्यात दंग होता. मैलन् मैल वाटा कापीत एका लोकवस्तीच्या ठिकाणी त्यानं मला उतरविलं. "अल्लाह तुम्हारी रक्षा करे!" असे बोलून घोडा फिरवून तो वेगाने निघून गेला. आणि तो गेल्या दिशेकडे सून्न नजरेने पाहात तिथल्या एका दगडावर मी बसलो. माझ्या डोळ्यांसमोर काळी काळी वलये विस्फारू लागली. मला ग्लानी आली. आणि पुढं काय झालं मला कळलं नाही !"

☆ ☆

"खरंच शोरी, माझ्या प्राणा, त्या दिवशी नवाब असफद्दौलाच्या संगीत दरबारात तुझं गाणं ऐकलं, आणि ही सोणा स्वतःला विसरली. अफाट विस्मयानं भारून गेली. नवाब असफद्दौलाच्या त्या संगीत दरबारात, त्यापूर्वी मी संगीतातली मोठमोठी असामी पाहिलेली होती. एकाहून एक मोठे. काय एकेकाचा लखलखीत गुण. जीव थक्क होऊन जाई; पण शोरी, तुझी आणि तुझ्या वडिलांची ती अद्वितीय जुगलबंदी ऐकली; काळीज कापून टाकणारा तुझा पहाडी आवाज आणि मन मोहून टाकणारे, मोत्यासारखे ओघळून येणारे, शरीरातील कणाकणात चैतन्य ओतणारे तुझ्या गीतातले ते शब्द ऐकले आणि मी हरवले. त्या क्षणापासून मी माझी उरले नाही तुझी झाले; शोरी, तुझी झाले !"

"किती अटीतटीचा सामना झाला तो सोणा. नवाब असफद्दौला मला आपल्या दरबारात बोलवील याची मला कल्पना नव्हती. टोळीतल्या त्या घोडेस्वाराने मला तिथं सोडले आणि तो निघून गेला. तिथं मी किती वेळ पडून होतो कोण जाणे पण मी शुद्धीवर आलो महमूद धोब्याच्या झोपडीत. त्याने मला बोलके करायचा खूप प्रयत्न केला पण मी एकही शब्द बोललो नाही. मी कोण आहे, कुठून आलो, कसा आलो, काय घडले हे मला कुणालाही सांगायचं नव्हतं. ज्या लखनौमधून एका रात्री घर सोडून पळून गेलो, योगायोगाने टोळीवाल्यांच्या हातात सांपडलो, सुदैवाने नऊ वर्षे त्यांच्या संगतीत राहूनही कलासाधनेत राहिलो, एका विलक्षण गूढ पुरुषाने पुत्रवत् माझा सांभाळ केला, मला माणूस बनविलं, त्याच लखनौमध्ये मी असा परागंदा होऊन पुन्हा येऊन पडेन असं मला वाटलं नव्हतं. जसं ते घडेल असं स्वप्नात देखील वाटलं नाही तसंच हे घडेल असंही स्वप्नातदेखील वाटलं नाही. पण ते घडलं सोणा, एकामागून एक धक्के मिळत गेले. त्या धक्यानी मन घडत गेलं. कठीण झालं !"

"सोणा, महमूदशी काहीही न बोलता मी त्याच्या झोपडीतून बाहेर पडलो आणि लोकवस्तीपासून दूर गोमतीच्या किनाऱ्यावर लहानसा आसरा करून राहिलो; पण संगीत हा गुणच असा आहे की तो माणसाला कधी लपवून ठेवत नाही. उत्तम गुणाच्या माणसाने कुठेही दडून राहायचा प्रयत्न केला तरी तो तसा राहू शकत नाही. शरीर लोकांचं नसतं पण गुण लोकांचा असतो. तो लोकाना ओढून आणतो, प्रेरणा देतो, आणि शरीराचे गाडे सुरळीत चालू ठेवतो. नवाब असफद्दौलाच्या कानावर माझी हकीकत कुणी घातली कोण जाणे. त्यांच्याकडून आमंत्रण घेऊन स्वार आला तेव्हा मी साफ नकार दिला. मला फकीराला दरबारात यायचं नाही असं ठासून सांगितलं. पुढे एक सरदार आला. आणि मागाहून साध्या वेषात नवाबही आले."

"नवाबांच्या विनंतीला मान देऊन मी दरबारात गेलो खरा पण

अनुक्रमणिका






तिथं त्यानी वेगळीच परिस्थिती निर्माण करून ठेवलेली. त्यांच्या संगीत दरबारात प्रवेश करताच मी आधीच भांबावून गेलो होतो. असा थाट आणि असं वातावरण मी पूर्वी कधीच पाहिलं नव्हतं. दरबारी रीतीरिवाज माझ्या माहितीत नव्हते. मी सरळ गेलो आणि मधल्या बैठकीवर मांडी घालून बसलो; पण नबाबसाहेब माणसापेक्षा गुणावर लुब्ध होणार होते. त्यानी माझ्या वर्तनाकडे लक्ष दिलं नाही. त्यातून मी फकीर वेषधारी. मला अमूक कर आणि तमूक कर असं कुणी सांगू शकत नव्हतं. नबाबसाहेब म्हणाले—

"मिया शोरी, आपण फार सुंदर गाता आणि आपली बरोबरी करणारा लखनौमध्येच काय पण हिंदुस्थानात कुणी आढळणार नाही असं ऐकलं. ही गोष्ट माझ्यासारख्या संगीतावर प्रेम करणाऱ्या आणि आपल्या पदरी कुणालाही हार न जाणाऱ्या गुणी माणसाना बाळगणाऱ्याला खटकली. मिया शोरी, माझ्या या संगीत दरबारात असा एक कलावंत आहे की जो आपल्या गाण्यानं माणसानाच काय पण पक्ष्यानादेखील मोहित करतो. त्याच्या गाण्यावर ताण करा म्हणजे तुम्हाला मागाल तितके मी द्रव्य देईन !"

"नबाबांच्या बोलण्याचं मला हंसू आलं. मी गप्प राहिलो. इतक्यात सारा साज घेऊन जी व्यक्ती बैठकीवर येऊन बसली तिला पाहातांच मी थक्क झालो. माझे अब्बाजान मिर्जा गुलाम रसूल ? माझ्या डोळ्यावर माझा विश्वास बसेना. मी एकटक त्यांच्याकडे पाहात राहिलो; पण ते माझ्याकडे पाहात नव्हते. मी त्यांचा प्रतिस्पर्धी होतो म्हटल्यावर ते माझ्याकडे का पाहातील ? त्यानी स्वर लावला, आलाप केले आणि सुरुवात केली—

"विद्याधर गुनिमन सो गुनकी चर्चा करीये,
लराई लरिये ।। धृ ।।"

"एक वजनदार खानदानी गायकी. कित्येक वर्षांनी मी माझ्या वडिलांचा आवाज ऐकत होतो. गतस्मृतीनी वेढून स्वत:ला विसरलो होतो. त्यांचं गायन कितीवेळ झालं, ते काय गायले, लोकानी त्याना किती दाद दिली याचं मला अजिबात भान नव्हतं; पण नबाबानी माझं नाव पुकारून फर्माईश करताच मला जाग आली आणि नकळत माझ्या तोंडून नवी कविता बाहेर पडली—

"भला वे मिर्जा मैंनु तेरे वेखणदा चाव ।।धृ।।
शहनशा दे दरबार बीच । टप्पे दी तान सुना जा ।
शोरी नु गळे नाळ लगा जा ।।१।।"

[मिर्जा, माझ्या जन्मदात्या, कित्येक वर्षांनी तुझं दर्शन झालं. तू मला ओळखावंस आणि आम्हा पिता-पुत्राची भेट व्हावी अशी केव्हापासून माझ्या हृदयाला तळमळ लागलेली आहे. ऐक मिर्जा, बादशहाच्या या दरबारात माझी टप्प्याची तान ऐक, आणि शोरीच्या गळ्यात गळा घालून त्याला एकदा कडकडून भेट...... ]

"माझं गाणं संपलं. टाळ्यांचा कडकडाट झाला. माझी जित झाल्याचं नबाबानी जाहीर केलं; पण मला हा असला सोहळा पाहायची इच्छाही नव्हती. कित्येक वर्षांनी मला माझा जन्मदाता भेटला होता. त्याच्या गळ्यात गळा घालून मला रडायच होतं. अपराधाचं परिमार्जन करायचं होतं. आणि मैफल संपली तसे माझे वडील मला भेटले. मला त्यानी पोटाशी धरलं. आमचं मीलन झालं. मला त्यानी परत घरी बोलावलं पण मी घरी गेलो नाही. त्यानी मला परोपरीनं सांगून पाहिलं; पण मी म्हटलं अब्बाजान आता या स्थितीत मी बाहेर राहाणंच चांगलं. मला पुन्हा आता तो मोह नको. त्यांची खूप समजूत घालून मी त्याना परत पाठविलं. आणि कुणाचीही कशाचीही भूल पाडून न घ्यायची अशी प्रतिज्ञा केलेली मी—तू मला आमंत्रण देताच तुझ्या डोळ्यांच्या जादूनं भारून जाऊन तुझ्या मागून तुझ्या कोठीवर आलो; कायमचा बंदिवान झालो. कसं घडलं हे सोणा ?"

"कसं घडलं हे मी काय सांगू ? माझं भाग्य थोर म्हणूनच तू मला लाभलास; पण मिया, आपल्याला आता उठलंच पाहिजे. रात्र वाढीला लागली. आणखी उशीर केला तर मावशीला ते सहन होणार नाही. तुझी माझी वेलीसारखी वाढत असलेली संगत आधीच तिला पसंत नाही. त्यातून तो भठियारा फक्रुद्दीन तिचा साथी ! त्याचा एक डोळा मावशीवर आणि दुसरा माझ्यावर. नाना प्रकारचे लोक घेऊन तो कोठीवर येतो. त्याच्यामुळे घी, मख्खन, मिठाई आणि अनेक गोष्टींची आमच्या घरात खैरात. त्यादिवशी एका सरदाराला घेऊन आला आणि बराच वेळ मावशीशी काही संगनमत करीत होता. मी मागल्या दरवाजाने बाहेर पडले आणि थेट तुझ्याकडे आले. मागं काय झालं ते मला कळलं नाही !"

"मी सांगू का सोणा, तुझं माझं मीलन होणं शक्य नाही. प्रीति म्हणजे भक्ती आहे असं समजून मी फक्त अपार प्रेमाचा

संगीत राजकीय जल्लोष !




आजवरी होता । सायलेन्स झोन
वाजवीन हॉर्न । दिल्लीमध्ये ।।

वर्षाव करणारा एक भावुक कलावंत आहे. पण तुमच्याकडे हे सारं व्यवहाराच्या काट्यावर तोललं जातं. मी हा असा भावडा, फकिरी वेशानं राहाणारा. माझ्या लेखी द्रव्य म्हणजे पाचोळ्यासारखं. त्या जुगलबंदीनंतर नबाब असफदौलानं चांदीच्या शेंकडो रुपयांनी भरलेल्या थाळ्या देणगी म्हणून माझ्याबरोबर पाठविल्या पण माझ्या झोपडीत पोहोचायच्या आधी मी त्या दिसेल त्या गरिबाला वाटून टाकल्या. माझं ते दायित्व ऐकून नवाबानी पहिल्याहून दुप्पट रक्कम पाठविली. तिची विल्हेवाट मी तशीच लावली. नवाब सारखे पाठवीतच राहिले, मी वाटत राहिलो. शेवटी माझ्या साधनेत व्यत्यय येतो; तुम्ही रुपये पाठविणं बंद करा, अशी विनंती मला नबाबाना करावी लागली. खरी प्रीत व्यवहार जाणत नाही, ती त्यागातून फुलते, सोणा ! मी जशी संगीताची तशीच प्रेमाची केवळ भक्ती करतो. मला वासना नाही नि कसला स्वार्थही नाही; पण सोणा, प्रथमदर्शनीच माझी तुझ्यावर मोहब्बत जडली आणि त्याबरोबरच संशयाचं पिशाच्चही माझ्या मानगुटीवर बसलं."

"संशय ? कसला संशय ? आणि तो कुणाबद्दलचा ?"

"कुणाबद्दलचा ! ते मला सांगता येणार नाही, सोणा. अनेक पुरुषांचं आणि चैनी लोकांचं तुमच्या कोठीवर येणं जाणं. शिष्टाचार म्हणून त्यांच्याजवळ तुला बोललं पाहिजे, हसलं पाहिजे हे जरी खरं असलं तरी माझ्या नजरेला ते सहन होत नाही. माझ्या आयुष्यात पहिली स्त्री तूच आलीस. वास्तविक माझे दुसरे अब्बाजान स्त्रीसंबंधी फार फार वाईट बोलत. स्त्री ही साधकाच्या मार्गातील खतरा आहे असं ते सांगत. जिच्यावर कधीही विश्वासाने मान टाकता येणार नाही अशी एकच गोष्ट आहे जगात, ती म्हणजे स्त्री. भावुक कलावंत एखाद्या स्त्रीच्या जाळ्यात अडकला म्हणजे त्याची अवस्था फासे पारध्याच्या जाळ्यात अडकलेल्या सावजासारखी होते. जितका जितका धडपडून तो आपली सुटका करून घ्यायचा प्रयत्न करील तितका तितका तो अधिकाधिक गुरफटत जाईल, असं ते म्हणायचे. मला तो अनुभव नाही, सोणा. आणि तो येऊही नये अशी त्या परवरदिगाराजवळ प्रार्थना करतो !"

"असं बोलून माझ्या जिवाला घोर कां लावतोस ? काय करायचा विचार आहे तुझा ? घर सोडून आत्ताच्या आत्ता तुझ्याजवळ येऊन राहू का ? बोल !

"माझ्या फकिराच्या झोपडीत ? आणि तुझे सगेसोयरे राहू देतील तुला ? शक्य नाही ते सोणा; शक्य नाही. क्षणिक मोहाला बळी पडून जन्माचं नुकसान करून घेऊ नकोस. मी तुला तसं करू देणार नाही. तुझं माझ्यावर प्रेम आहे एवढा आनंद मला पुरेसा आहे. त्याच्या चिंतनानं आजची रात्र मी सुखानं झोपेन. जा तू सोणा, उद्या आजच्यासारखीच किनाऱ्यावर मी तुझी वाट पाहीन !"

☆ ☆

भेटी वाढत चालल्या. जवळिकेची ओढ अधिकाधिक निर्माण होत राहिली. आणि त्यातूनच नवनवे टप्पे फुल लागले. शोरीने सवाल पुसावा, सोणाने जबाव द्यावा. श्वासातून, अंगगंधातून, स्पर्शातून नव्या टप्प्यांचा सुगंध वहरू लागला. एका दिवसाचा विरह अर्ध्या दिवसावर आला आणि पुढे तो घटिकाभरही सहन होईनासा झाला. गोमतीच्या नदीतटाकीची झाडे झुडपे मुकपणाने ती निरागस प्रीति पाहात होती.

घरच्या जाचाने सोणा मनातल्या मनात अस्वस्थ राही. त्याच्यापासून ती आपले दुःख लपवून ठेवी. शोरीला नुसत्या तिच्या स्पर्शातच तो फरक जाणवे. शंकेने त्याचे मन पेटत राही. मग एखाद्या वेळी स्फोट होई. तो तोंडाला येईल ते बोलत राही. डोळे मिटून टप्प्याचे नादमधुर बोल स्रवणारी त्याची वाणी तिच्या जिव्हारी जखम करणारे शब्द उच्चारी. त्याच्या मनातली शंका तिच्या-ध्यानी मनी नसलेले कल्पना–चित्र उभारी....

"बोल सोणा, तू पापी आहेस हे कबूल कर. माझ्यासारख्या शुद्ध, सात्विक कलावंतावर प्रेम करायची तुझी लायकी नाही. तुझा स्पर्श मला सांगतो आहे सोणा, तू मला फसवते आहेस. तुझ्यावर मी विश्वास ठेवला हीच मुळी चूक केली. तुझंही बरोबर आहे. मजसारख्या भणंगाकडून तुला काय मिळणार? एखादा टप्पा रचून तुला दाखविणं म्हणजे सोन्यामोत्यांचा हार तुझ्या गळ्यात घालणं नव्हे. तो एखाद्या सरदार दरकदारानंच द्यावा. काल तुझ्या घरी एखादा सरदार आला असेल; तू त्याच्याशी गोड गोड बोलली असशील; हंसली खिदळली असशील. मग त्यानं तुझा हात धरला असेल; तुझ्या गळ्यात गळा घातला असेल; तुला छातीशी धरून घट्ट कवटाळली असेल; आणि मग सोन्याचा हार तुझ्या गळ्यात बांधून तुझं तोंड वर करून तुझ्या ओठाचं.... "

"खबरदार, पुढं काही बोललास तर. कसं बोलवतं तुला. अरे, तुझ्या चिंतनाशिवाय दिवसातील एक क्षणही जात नाही माझा. माझी अन्नपाण्यावरची आसक्ती उडाली रे. या खेदानं मी मरून जाईन की काय याची भीति वाटते मला. काल मावशी म्हणाली–"

"काय म्हणाली ?"

"एवढं जर त्याचं तुझ्यावर प्रेम असेल तर त्याला परीक्षा दे म्हणावं !"

"कसली परीक्षा ?"

"मावशी म्हणाली कोठीवाली जात खऱ्या प्रीतीची पारख एकाच उपायानं करीत असते. आणि तो उपाय म्हणजे प्रेम करणाऱ्या पुरुषानं तापलेला तवा क्षणभर आपल्या छातीवर ठेवून घेणं. त्याची मोहब्बत खरी असेल तर त्या तव्याचा चटका त्याला लागणार नाही. या परीक्षेत तुझा शोरी उतरला तर तू खुशाल त्याच्याशी शादी कर. आम्ही तुझा निका मोठ्या थाटात लावून देऊ. शोरी, तू देशील का तशी परीक्षा ? तुझ्याशिवाय मला आता राहवत नाही रे. माझा जीव आता नित्य घाबरा होऊ लागलेला आहे. शक्य तो लवकर तुझं माझं मीलन व्हावं असं मला सारखं वाटतं आहे !"

सोणा, तशी परीक्षा द्यायला माझी मुळीच ना नाही. मावशी आणि तिचे ते साथीदार, सोणा, ते दुष्ट आहेत असं मी म्हणत नाही

# भारतीय संस्कृतीचा जयजयकार

जगभर वंद्य झालेल्या भारतीय शास्त्रीय संगीताची परंपरा चालविणारे

## शिलेदार

* सुरश्री केसरबाई केरकर
* उस्ताद बडे गुलामअली खान
* उस्ताद अमीरखान
* पै. उस्ताद फैयाझखान
* पै. उस्ताद अब्दुल करीम खान
* पंडित ओंकारनाथ ठाकूर
* पंडित भीमसेन जोशी
* पंडित जसराज
* स्व. पंडित डी. व्ही. पलुस्कर
* कुमार गंधर्व
* श्रीमती माणिक वर्मा
* श्रीमती किशोरी आमोणकर
* उस्ताद अली अकबरखान
* उस्ताद बिस्मिल्लाखान
* उस्ताद बिलायतखान
* उस्ताद अब्दुल हालिम जाफ़रखान
* पंडित रविशंकर
* पंडित गजाननराव जोशी
* प्रोफेसर व्ही. जी. जोग
* पंडित रामनारायण
* स्व. चतुरलाल
* पंडित शिवकुमार शर्मा
* श्रीमती शरणराणी माथुर
* स्व. पन्नालाल घोष

ह्या व अग्रगण्य ठरलेल्या अन्य कलाकारांची कला
जतन करून घरोघरी पोंचविणारे




**हिज् मास्टर्स व्हॉइस व कोलंबिया रेकॉर्डस्**




THE GRAMOPHONE COMPANY OF INDIA (PRIVATE) LIMITED
ONE OF THE EMI GROUP OF COMPANIES
Calcutta — Bombay — Delhi — Madras












पण ते अविचारी मात्र खात्रीनं आहेत. असल्या अविचारी माणसांच्या विचारांशी सहमत होऊन तू आततायीपणा करू नकोस. माझं ऐक सोणा, अल्लातालावर विश्वास ठेव —

"हो सोणा, मान न करिये । रबंदा नाळ डरिये ।।"

अश्रुधारा वाहवीत आणि हुंदके देत सोणाने जबाब दिला-शोरी, हीच वेळ सोनेरी आहे रे. आता पुढचं पाऊल टाकलं पाहिजे—

"पी प्याला मदशिका शोरी वे मिया ।
समळ समळ पग धरिये ।।"

आणि हुंदके देत देत ती परत गेली. दुसऱ्या दिवशी सबंध दिवस ती किनाऱ्याला आली नाही. शोरी वाट बघून बघून दमला. मनस्तापाने बेकाम झाला. त्याची पंचेंद्रिये तापून उठली. सोणासाठी कोणतेही विकट साहस करण्याकरिता त्याचे मन तयार झाले. याच्यात जिंकलो तरी वाहवा न जिंकलो तरी वाहवा. निदान सच्च्या मोहब्बतीला एवढी किंमत दिलीच पाहिजे अशा कल्पनेने पुढील दिव्य करण्यासाठी त्याने जणू पतंगासारखी झेप घेतली. जग काय आहे याची मीमांसा त्याने टोळीतल्या फकीराकडून म्हणजे त्याच्या दुसऱ्या अब्बाजानकडून ऐकलेलीच होती. मतलबी लोकांच्या कुटिल नीतीची यत्किंचितही जाणीव नसलेला, वैर नसलेला, सूड नसलेला भावडा शोरी, सोणाच्या मावशीने नि तिच्या साथीदारानी रचलेल्या षड्यंत्रात उडी घालायला तयार झाला. संतापाने जळत तो सोणाच्या कोठीवर आला. गळाला लावलेल्या भक्ष्याच्या आशेने मासा ओढून यावा तसा.

तो तसा येणार याची मावशीला आणि फकुद्दीनला कल्पना होतीच. 'तुझ्या बऱ्याकरिता, लवकरात लवकर तुझं आणि त्याचं मीलन घडवून आणण्याकरिता आमची ही सारी खटपट आहे' असा सोणाचा समज करून देऊन त्यांनी तिला शोरीकडे जाऊ दिले नव्हते. अधीर झालेली सोणा बेसावध झाली; त्यांच्या जाळ्यात फसली. शोरीला पाहून मावशीची आणि फकुद्दिनची नेत्रपल्लवी झाली. शोरीने कुर्न्यातच प्रश्न केला—

"मावशी, सोणा कुठं आहे ?"

"अरे, ती तर आत्ताच गेली सरदार सिद्दिक शहाबरोबर, त्याच्या घोड्यावर बसून !"

"काय अर्थ घ्यावा मी याचा ?"

"का ? तिनं कुठं जाऊ नये ? तिची त्याची मोहब्बत जडली, नि ती गेली त्याच्याबरोबर जरा मजा करायला !"

"शक्य नाही मावशी, शक्य नाही !"

"का शक्य नाही ?"

"तिची सच्ची मोहब्बत माझ्यावर आहे आणि माझी तिच्यावर !"

"कोठीवरच्या मुलीवर असलेली सच्ची मोहब्बत शाबित करायला कोणतं दिव्य करावं लागतं ठाऊक आहे तुला ?"

"हो, सोणानं सांगितलं आहे मला सा !"

"मग आहे तुझी तयारी ?"

"एका पायावर तयार आहे मी !"

"काही शर्त ?"

"कोणतीही नाही !"

"बघ हो, विचार कर. काही बरं वाईट झालं तर आम्ही जबाबदार नाही !

"त्याची तुम्हाला काळजी नको मावशी. मी माझ्या मुखत्यारीत हे दिव्य करायला तयार झालेलो आहे. तुम्हाला जबाबदार धरणार नाही मी. आणि जाब विचारणारं देखील कुणी नाही माझं !"

फकुद्दिन आणि त्याची माणसे तयारच होती. त्यानी आपल्या भटारखान्यातला तवा आणून तो चांगला लाल होईपर्यंत तापवला. तुफान झालेला शोरी आडवा झाला; आणि त्याने तो तवा आपल्या छातीवर ठेवून घेतला. फकुद्दीनने नोकराना खूण करून तो घट्ट दाबायला सांगितला.

शोरीने हूं की चूं केले नाही. गुदमरलेला श्वासदेखील सोडला नाही. सच्च्या मोहब्बतीसाठी झुरणारे त्याचे सोशिक मन जराही बावचळले नाही. प्रीतीच्या अनंत सुखासाठी जीवन संपुष्टात आणणारी ती अपार वेदना डोळे आणि ओठ मिटून त्याने भोगली. आणि कोंडून ठेवलेली त्याच्या मोहब्बतीची ऊर्मी त्या दाहाने उसळून बाहेर आली. त्या ऊर्मीने मागल्या दरवाजाने नदी किनारी त्यालाच भेटायला, त्याचा विरहाग्नि शांत करायला पळून गेलेल्या सोणाला त्याच क्षणी पिटाळून परत आणले; पण शोरीचे निष्प्राण शरीर पाहून तिचे भान हरपले. सारे अवसान संपले. सारी शक्ती एकवटून तिने टाहो फोडला—

"शोरी, मिया शोरी, माझ्या प्राणा, मला एकटीला ठेवून तू निघून गेलास ? अरे, या दुष्टांनी मला फसवलं रे फसवलं. मला कायमची नागवली. तुझ्या प्रीतीची अघोरी, अत्याचारी परीक्षा घ्यायला प्रवृत्त केलं. दिवसभर विचार करीत मी थांबले. जणू काळानेच मला थांबायची दुर्बुद्धी दिली. ठरल्या वेळी मी आले असते तर असा हा भयंकर प्रसंग ओढवला नसता."

"शोरी, शोरी, मिया जागा हो. तुला अल्लाची कसम आहे. तुझ्या गुरुची, तुझ्या अब्बाजानची कसम आहे. असा जाऊ नकोस शोरी. मागं फिर. अरे, मी माझं मन, माझे प्राण तुझ्याजवळ ठेवायला दिलेले आहेत. ते घेऊन इथं आलास आणि माझ्याशी न बोलता, मला न भेटता जातोस. गोमतीच्या किनारी माझ्या मांडीवर मस्तीत झोपून टप्पे रचायचास तसाच याही वेळी झोपला आहेस; बोल मिया एखादा टप्पा बोल. मला त्या ओळी ओठावर खेळवू दे. आणि मग छातीशी घट्ट कवटाळून नेहेमीसारखा म्हण— नैनुवा के बाण ! सुन सोणा 'शुद्धकल्याण' के यह टप्पा. . . . . बोलरे मिया, बोल, डोळे उघडून एकदाच माझ्याकडे पहा, आणि म्हण—रागावलीस, सोणा ?. . . असा काही न सांगता जाऊ नकोस. मिया परत ये. . .

ओ मिया वे जानेवाले । तेनु अल्लादि कसम ।
मुडी आवे चिरेवाला ।।धृ।।
आंदा वी जांदा मिया । तुसी मन ले जांदा ।
शोरी शरे मतवाला । गले लग जांदा ।।१।।

तिने एकदा डोळे भरून त्याच्याकडे पाहिले. आणि त्याच्या करपलेल्या छातीवर मस्तक ठेवून आपल्या आसू भरल्या पापण्या मिटल्या. ज्योतीला ज्योत मिळाली, चेतनेला चेतना मिळाली. प्रेमाच्या राज्यात आणखी दोन शरीरे निष्प्राण झाली आणि आवाजाच्या सगळ्या दुनियेच्या ओटी एक टप्पा अमर झाला—

"ओ मिया वे जाने वाले"

☆ ☆ ☆

अशी ही कहाणी टप्प्याच्या राजा-राणीची. . . मिया शोरीची आणि सोणाची. लैला-मजनू, शीरीं फरहाद, हीर-रांझा, सोनी-महवाल. . . . यांच्या अपार प्रीतीसारखीच. गोमतीच्या किनाऱ्यावरील काही खेड्यातील भोळी भावडी माणसे आंवढे घोटीत, सुस्कारे सोडीत, डोळ्यांच्या कडा ओल्या करीत ती सांगतात.

●●●









अनुक्रमणिका

**"तुमचे हे काव्य युद्धाशिवाय बंगाल व महाराष्ट्र यांचे मीलन घडवून आणील, असे पत्र लो टिळक यांनी रवींद्रनाथ टागोर याना लिहिल्याचे ऐकिवात आहे. "शिवाजी–उत्सव" या त्या-काव्याची ही झलक....**



# छत्रपति शिवाजी महाराज
# आणि
# कवींद्र रवींद्रनाथ टागोर

—श्रीपाद जोशी

**महाराष्ट्राच्या** इतिहासाबद्दल आणि एकूण मराठी लोकांबद्दल भारतामध्ये सर्वांत अधिक आकर्षण जर कोणत्या प्रांताला वाटत असेल तर ते बंगालला होय! कै. रमेशचंद्र दत्त व कै. यदुनाथ सरकार यानी मराठ्यांच्या खऱ्या इतिहासाला जगापुढे आणण्याची जी कामगिरी केली, तिच्याबद्दल महाराष्ट्र त्यांचा सदैव ऋणीच राहील. परंतु हे ऋण केवळ इतिहासाच्या क्षेत्रापुरतेच मर्यादित नाही. साहित्याच्या क्षेत्रातहि बंगाली लेखकांनी व कवींनी महाराष्ट्राविषयीची आपली भक्ति व प्रीति कथा, नाटके, कादंबऱ्या व कविता यांच्या द्वारे व्यक्त केली आहे. त्या सर्वांमध्ये विश्वकवि रवीन्द्रनाथ टागोर यांचे कार्य विशेष उल्लेखनीय आहे. रवीन्द्रनाथांनी महाराष्ट्राचे प्रतिनिधि असलेल्या शिवाजी महाराजांसंबंधी कोठे कोठे काय काय लिहिले आहे, याचा आढावा घेणे बोधप्रद, मनोरंजक व औचित्यपूर्ण होईल.

## 'शिवाजी–उत्सव'

लोकमान्य टिळकांनी १८९७ साली देशभक्तीच्या भावनेचा प्रसार करण्याच्या हेतूने शिवाजी उत्सव सुरू केला. या उत्सवाचे लोण बंगालमध्ये नेऊन पोचविण्याचे कार्य कै. सखाराम गणेश देउस्कर नांवाच्या महाराष्ट्रीय गृहस्थांनी केले. श्री. देउस्कर हे बंगाली साहित्यात एक प्रतिष्ठित व लोकप्रिय लेखक समजले जात. त्यांनी राष्ट्रीय विचारांचा प्रसार करणारी अनेक पुस्तके बंगालीत लिहिलेली आहेत. त्यांच्या प्रयत्नांमुळे १९०४ साली कलकत्यात फार मोठ्या प्रमाणावर शिवाजी-उत्सव साजरा होऊ शकला. त्यांच्या विनंतीवरून रवीन्द्रनाथांनी 'शिवाजी-उत्सव' ही सुमारे १५० पंक्तीची दीर्घ, प्रसादपूर्ण कविता बंगाली भाषेत लिहिली; इतकेच नव्हे तर कलकत्त्याच्या टाऊन हॉलमध्ये त्यानी ती स्वतः वाचनहि दाखविली. **असे सांगत त की सदर कवितेचे मराठी भाषांतर वाचल्यानंतर लोकमान्य टिळकांनी रवीन्द्रनाथांना लिहिले की, "खरोखरीच हे तुमचे काव्य युद्धाशिवाय बंगाल व महाराष्ट्र यांचे मीलन घडवून आणील."** कारण या कवितेत एके ठिकाणी रवीन्द्रनाथांनी शिवाजीला उद्देशून म्हटले आहे:

एक कथा भावे नि केह ए तिन शताब्दकाल धरि
जाने नि स्वपने—
तोमार महत् नाम बङ्ग–माराठारे एक करि
दिबे बिना रणे,

[गेल्या तीन शतकांपासून कोणाच्या मनात असा विचार आला नाही, नव्हे स्वप्नातहि कोणाला हे कळले नाही की, तुझे महान नांव बंगाल महाराष्ट्राला युद्धाशिवाय एकत्र करील.]

**बंगल्यांना आवाहन :**

भारतातील राष्ट्रीय उत्थानाच्या त्या प्रारंभिक काळात भारतीयांची मने आपल्या इतिहासातून प्रेरणादायक वीर पुरुषांची चरित्रे शोधून काढण्यात मग्न झालेली होती. रवीन्द्रनाथांनी





अनुक्रमणिका

आपल्या 'शिवाजी–उत्सव' कवितेच्या द्वारे बंगालला असाच एक वीर पुरुष मिळवून दिला. त्यांचा हा शिवाजी, खंडित व छिन्न-विच्छिन्न भारताला, पुनः एकदा एका धर्मराज्याच्या सूत्राने एकत्र बांधू इच्छित होता. पूर्वग्रहदूषित देशी-विदेशी इतिहास-कारांनी त्याच्या चारित्र्यावर उडविलेले शितोडे आता पूर्ण पुसले गेले होते आणि तो नव्या दुप्पट तेजाने उजळून निघाला होता. त्याने सबंध भारताला स्वराज्याची व स्वातंत्र्याची प्रेरणा दिली होती. त्यामुळेच महाराष्ट्र व बंगाल यांना एकत्र येण्याचे आवाहन विश्वकवीने केले होते. आपल्या या कवितेच्या शेवटच्या कडव्यांत रवीन्द्रनाथ बंगाल्यांना उद्देशून म्हणतात :

माराठिर साथे आजि हे बाङाली, एक कण्ठे बलो
'जयतु शिवाजि'।
माराठिर साथे आजि बाङाली, एक संगे चलो
महोत्सवे साजि।
आजि एक सभातले भारतेर पश्चिम-पूरब
दक्षिण ओ बामे
एकत्रे करुक भोग एक साथे एकटि गौरव
एक पुण्य नामे ।।

[हे बंगाल्यांनो, आज तुम्ही मराठ्यांसह एका स्वरात अशी घोषणा करा की, 'शिवाजी महाराजांचा विजय असो,' हे बंगाल्यांनो, आज तुम्ही मराठ्यांसह नटूनसजून महोत्सवाला चला. आज एका सभेमध्ये भारताचे पूर्व, पश्चिम, दक्षिण व उत्तर भाग एकत्र येऊन एका पवित्र नांवापासून एकदिलाने महान् गौरव प्राप्त करोत.]



याच कवितेत रवीन्द्रनाथ एके ठिकाणी म्हणतात :–

माराठार प्रान्त इते एकदिन तुमि धर्मराज,
डेकेछिले जबे
राजा बोले जानि नाइ, मानि नाइ, पाइ नाइ लाज
से भैरव रवे
तोमार कृपाणदीप्ति एकदिन जबे चमकिला
बंगेर आकाशे
से घोर दुर्योगदिने ना बुझिनु रुद्र सेइ लीला
लुकानु तरासे

[हे धर्मराजा, महाराष्ट्राच्या सरहद्दीवरून जेव्हा एके दिवशी तूं आम्हाला साद घातलीस तेव्हा आम्ही तुला 'राजा' म्हणून ओळखले नाही, मानले नाही. त्या शिवगर्जनेची आम्हाला लाज वाटली नाही. एके दिवशी जेव्हा तुझ्या तलवारीचा प्रकाश बंगा-लच्या आकाशात झळकला तेव्हा त्या भयंकर वादळाच्या दिवशी आम्हाला ती रुद्रलीला कळली नाही, आम्ही भीतीने लपून बसलो.]

मृत्युसिंहासने आजि बसियाछ अमरमुरति–
समुन्नत भाले
जे राजकिरीट शोभे लुकावे ना तार दिव्यज्योति
कभु कोनो काले।
तोमारे चिनेछि आजि चिनेछि चिनेछि हे राजन्
तुमि महाराज।
तव राजकर लये आट कोटि बंगेर नन्दन
दाँडाइबे आज।।

[हे अमरमूर्ति, आज तूं मृत्युसिंहासनावर बसला आहेस. तुझ्या उन्नत मस्तकावर जो राजकिरीट शोभत आहे त्याची दिव्य-ज्योति कधीहि नष्ट होणार नाही. हे राजा, आम्ही तुला आता ओळखले आहे, ओळखले आहे, ओळखले आहे. तूं तर महाराज आहेस. तुझा राजकर घेऊन बंगालचे आठ कोटि सुपुत्र आज उभे राहतील.]

से दिन शुनि नि कथा—आज मोरा तोमार आदेश
शिर पाति लब
कंठे कंठे वक्षे वक्षे भारते मिलिबे सर्व देश
ध्यानमंत्रे तव
ध्वजा करि उड़ाइब बैरागीर उत्तरीवसन–
दरिद्रेर बल
'एकधर्मराज्य हबे ए भारते' ए महावचन
करिब सम्बल ।

[त्या दिवशी आम्ही तुझे सांगणे एकले नाही. आता आम्ही तुझा आदेश शिरसावंद्य मानू. कंठाकंठातून व हृदयाहृदयातून सारा भारत देश तुझ्या ध्यानमंत्रामध्ये एक होईल. बैराग्याच्या




उपरण्याची ध्वजा बनवून ती आम्ही फडकवू. तेच तर दरिद्री लोकांचे बळ! 'या भारतात एकधर्मराज्य बनेल—' या महावचनाचा आम्ही पाथेय बनवू]

## रामदास व शिवाजी

छत्रपति शिवाजी महाराज व समर्थ रामदास यांचा संबंध हे इतिहासातील एक न उकललेले गूढ आहे. त्या दोघांच्या संबंधींविषयी कितीतरी आख्यायिका महाराष्ट्रात प्रचलित आहेत. त्यांत ऐतिहासिक तथ्य कितपत आहे, याचा निर्णय अद्यापि लागावयाचा आहे. परंतु त्यातील काही घटनांची आधुनिक काळातील देशभक्तांना व साहित्यिकांनाहि स्फूर्ति व प्रेरणा दिली आहे. रवीन्द्रनाथांनीहि भगव्या झेंड्याच्या उत्पत्तीशी संबंधित घटनेवर 'प्रतिनिधि' या नांवाची एक सुंदर कविता लिहिली आहे. शिवाजीने आपले राज्य रामदासांच्या झोळीत टाकल्याची कथा वर्णन करून रवीन्द्रनाथ पुढे म्हणतात :

गुरु कहे, "तबे शोन् करिलि कठिन पण,
अनुरूप निते हवे भार—
एइ आमि दिनु कये, मोर नामे मोर हये
राज्य तुमि लहो पुनर्बार।
तोमारे करिला विधि भिक्षुकेर प्रतिनिधि
राज्येश्वर दीन उदासिन;
पालिबे जे राजधर्म जेनो ताहा मोर कर्म,
राज्य लये रबे राज्यहीन।
वत्स, तबे एइ लहो मोर आशीर्वाद-सह
आमार गेरुवा गात्रवास;
वरागीर उत्तरीय पताका करिया नियो।"
कहिलेन गुरु रामदास।

[गुरुदेव म्हणाले, "तर मग ऐक. तू मोठी कठिण प्रतिज्ञा केली आहेस. ती योग्य प्रकारे पार पाडली पाहिजेस. माझे तुला असे सांगणे आहे की माझ्या नांवाने, माझ्या वतीने, तू हे राज्य परत घे. विधात्याने तुला भिक्षुकाचा, भिकाऱ्याचा प्रतिनिधि बनविला आहे. तू राज्येश्वर आहेस, परंतु त्याचबरोबर तू दीन व विरक्त बनावेस. तू राजधर्माचे जे पालन करशील ते माझेच काम म्हणून करशील, हे लक्षात ठेव. राज्य असूनहि तू राज्यहीनाप्रमाणे राहा. हे वत्सा, तर मग माझ्या आशीर्वादासह हे माझे भगवे वस्त्र तू घे. संन्याशाच्या या उपरण्याची तू पताका कर." गुरू रामदास म्हणाले.

## 'शिवाजी व मराठा जाति'

शान्तिनिकेतनातील ब्रह्मचर्याश्रमाचे भूतपूर्व प्राध्यापक कै. शरत्-कुमार राय यानी इ. स. १९०८ साली लिहिलेल्या 'शिवाजी ओ मराठा जाति' या पुस्तकाला रवीन्द्रनाथांनी लिहिलेली प्रस्तावना 'शिवाजी ओ मराठा जाति' या शीर्षकाने 'इतिहास' या त्यांच्या ऐतिहासिक लेखसंग्रहात समाविष्ट करण्यात आलेली आहे. या प्रस्तावनेतील काही विधाने अत्यंत मार्मिक व विचारांना चालना देणारी आहेत. एके ठिकाणी ते म्हणतात :

"आधुनिक भारतातील एखाद्या प्रदेशाला ज्याच्यातून एखादे ऐतिहासिक तत्त्व शिकता येते असा इतिहास असेल तर तो मराठ्यांचाच इतिहास होय."....

"बहुधा राष्ट्रीय अभ्युत्थानाच्या मुळाशी एक किंवा अधिक महापुरुष असल्याचे आपल्याला दिसून येते. परंतु ही गोष्ट लक्षात ठेवली पाहिजे की, देशामध्ये विशालतेची भावना व्यक्त झालेली नसेल, तर ते सारे महापुरुष आपले स्वतःचे सारे सामर्थ्य प्रकट करू शकत नाहीत. पुष्कळ दिवसांपासून चारी दिशांनी त्याची तयारी व्हावी लागते. त्या तयारीत लहानमोठ्या सर्वांचा भाग असतो. अखेर शेवटी शक्तिशाली व्यक्ति उत्पन्न होऊन ती त्या तयारीचा प्रत्यक्ष व्यवहारात वापर करते.

"मराठ्यांच्या इतिहासात आपल्याला शिवाजी हाच सर्वश्रेष्ठ पुरुष दिसतो. परंतु साऱ्या मराठ्यांनी मिळून शिवाजी महाराजांना मोठे केले नसते तर ते मोठे होऊ शकले नसते. पुष्कळ दिवसांपासून अनेक धर्मवीर देशातील लोकांमधील उच्चनीच, ब्राह्मण-शूद्र वगैरे कृत्रिम भेदभाव दूर करून त्यांना एकमेकांजवळ आणण्याचा प्रयत्न करीत होते. त्यानी सर्वसामान्य व विशिष्ट अशा सर्वच लोकांसाठी भक्तीचा राजमार्ग खुला करून दिला होता. एका परमेश्वराच्या अधिपत्याखाली त्यानी देशातील सगळ्याना समान गौरवाचे हक्कदार बनविले होते. महाराष्ट्रातील धर्मान्दोलनाने देशातील सारे लोक एकत्र घुसळले जात होते. शिवाजी महाराजांची प्रतिभा त्याच मंथनातून निर्माण झालेली होती. ती साऱ्या देशाच्या धर्मोद्बोधनाशी सम्बद्ध होती.







**त्यामुळेच देशाच्या शक्तीत शिवाजी महाराजांना धन्यता लाभली; आणि त्यांच्या शक्तीमुळे देश धन्य झाला.**

"शिवाजी हा केवळ प्रतिभाशाली दरवडेखोर होता, स्वतःचा स्वार्थ साधण्यासाठी व आपली सत्ता वाढविण्यासाठीच त्याने असामान्य कौशल्य वापरले, ही कल्पना जर खरी असती तर त्यांच्या त्या दरवडेखोरीच्या आधाराने सारी मराठी जनता कधीच एक होऊ शकली नसती. विशेषतः शिवाजी महाराज जेव्हा औरंगजेबाच्या जाळ्यात सांपडून कैदी बनले होते आणि त्यांना आपल्या राज्यापासून दीर्घकाळपर्यंत दूर रहावे लागले होते, तेव्हाहि त्यांची कीर्ति भग्न होऊन धुळीला मिळाली नाही, याचे एकमात्र कारण हेच की सर्व देशाच्या धर्मवृद्धीशी त्यांच्या प्रयत्नांची सांगड घातली गेलेली होती. वस्तुतः त्यांची साधना हे सर्व देशाच्याच धर्मसाधनेचे एक विशेष प्रकटीकरण होते. या धर्मसाधनेच्या आव्हानामुळेच शतखंड झालेले मराठे आपली विच्छिन्न शक्ति एकत्रित करून ती एका मंगल उद्दिष्टासाठी समर्पित करू शकले. लुटीच्या वांटणीवरून, सत्तेच्या वांटणीवरून त्यांनी आपसात हाणामारी, कापाकापी केली नाही.

"अखेर कालान्तराने जेव्हा ही धर्मसाधना स्वार्थसाधनेत परिणत होऊन विकृत झाली, आणि साऱ्या देशाची शक्ति पुनः एकत्र होऊ शकली नाही, तेव्हा परस्पर अविश्वास, मत्सर, विश्वासघात इत्यादींनी वडाच्या पाळामुळांप्रमाणे मराठ्यांच्या प्रतापाच्या विशाल प्रासादाच्या भिंती दीर्ण विदीर्ण करून टाकल्या. धर्माने साऱ्या समाजाला एक केले होते; आणि स्वार्थाने त्याला विस्कळीत करून टाकले--हाच मराठ्यांच्या अभ्युत्थानाचा व पतनाचा इतिहास होय."

## शिवाजी व गुरु गोविंद सिंह

रवीन्द्रनाथ हे केवळ शब्दांचे ठोकळे जुळविणारे कवि नव्हते. तर अत्यंत प्रतिभावान् विचारक होते; याची चुणुक त्यांच्या या लहानशा लेखावरून दिसून येते. वर उल्लेखिलेल्या 'इतिहास' या संग्रहामध्ये 'शिवाजी व गुरु गोविंद सिंह' हा एक चर्चात्मक विस्तृत लेख प्रसिद्ध झालेला आहे. मराठे व शीख यांच्या इतिहासातील सूक्ष्म फरक त्यांनी या लेखात दाखवून दिला आहे. या लेखाची सुरुवातच ते अशी करतातः–

"शीख–इतिहास आणि मराठा–इतिहास यातील मुख्य फरक असा की मराठा इतिहासाचे पहिले व प्रमुख नायक जे शिवाजी महाराज, त्यांनी हिंदु राज्य स्थापन करण्याचे ध्येय मनामध्ये स्पष्टपणे निश्चित करून इतिहासाच्या रंगभूमीवर महाराष्ट्रीयांना आणले होते. त्यांनी देशजय, शत्रुविनाश, राज्य-विस्तार वगैरे जे काही केले ती सारी एका भारतव्यापी महान् संकल्पाचीच अंगे होती.

"याच्या उलट शीख-इतिहासाचा आरंभ मूलतः धार्मिक इतिहासाच्या रूपाने झाला होता....

"शिवाजी महाराजांनी जे कार्य अंगावर घेतले होते ते कोणत्याही एखाद्या लहानशा गटापुरते मर्यादित नव्हते. याचे मुख्य कारण असे की त्यांनी ज्या हिन्दु जातीला व हिन्दु धर्माला मुस्लिम सत्तेच्या जोखडातून मुक्त करण्याचा संकल्प केलेला होता, ती जाति व तो धर्म ही शीख जाति धर्मापेक्षा कितीतरी पटींनी अधिक व्यापक होती. यामुळे समग्र भारताचाच इतिहास नव्याने घडविण्याचे उद्दिष्ट त्यांनी आपल्यासमोर ठेवले होते, यात शंका नाही.

"गुरु गोविंदांनी मोंगलांशी अनेक लढाया केल्या; पण त्यात काही सूत्रबद्धता नव्हती. प्रतिहिंसा व आत्मसंरक्षण हे त्यांचे मुख्य उद्देश होते. परंतु शिवाजी महाराजांनी ज्या काही लढाया केल्या त्या एखाद्या सोपानपरंपरेप्रमाणे सूत्रबद्ध होत्या. त्या रागारागाने केलेल्या नुसत्या हाणामाऱ्या नव्हत्या. सबंध भारतवर्षाला व दूरपर्यंतच्या काळाला नजरेसमोर ठेवून त्यांनी एक महान् ध्येय निश्चित केले होते. त्यात खूप क्रमबद्धता होती. ती काही एखाद्या साम्प्रदायिक प्रक्षोभाची अभिव्यक्ति नव्हती. एक फार मोठे उद्दिष्ट साध्य करण्याचा तो एक प्रयत्न होता."

## शिवाजी महाराजांतील उणीवाही !

रवीन्द्रनाथ हे शिवाजी महाराजांचे चाहते होते, परंतु आंधळे स्तुतिपाठक नव्हते. त्यांच्या सूक्ष्म दृष्टीला शिवाजी महाराजांमधील काही उणीवाहि दिसल्या. आणि त्यांनी त्या निःसंकोचपणे सांगून टाकल्या. तसे करण्यामध्ये शिवाजी महाराजांचा अधिक्षेप करण्याची वृत्ति नसून एका थोर पुरुषाचे ऐतिहासिक-दृष्ट्या योग्य मूल्यमापन करण्याची इच्छा आहे, हे उघड दिसते. अर्थात् त्याकाळी (१९१० साली) जी साधनसामग्री उपलब्ध होती, तिच्या आधारावर त्यांनी आपली मते बनविली असणार हे उघड आहे. त्यानंतर गेल्या छप्पन वर्षांत शिवचरित्राची अनेक नवनवीन साधने उजेडात आली आहेत, येत आहेत. त्यांच्या योगे शिवाजी महाराजांच्या योग्यतेला अधिकाधिक उजाळाच मिळत आहे, ही गोष्ट विसरता कामा नये. 'शिवाजी ओ गुरु गोविंद सिंह' या आपल्या लेखाच्या उत्तरार्धात रवीन्द्रनाथ म्हणतातः–

"परंतु असे असूनहि शीख व मराठे या दोन्ही जातींचा इतिहास एकाच वेळी एकाच प्रकारे निष्फळतेत परिणत झाला, याचे कारण काय? याचे कारण हेच की जे उद्दिष्ट सबंध देशाला व्यापू इच्छिते ते केवळ एका अथवा काही थोड्या विशालहृदयी व्यक्तींच्या आधाराने सफल होऊ शकत नाही. ठिणगीतून ज्योत निर्माण करावयाची असेल तर केवळ सारे बळ एकवटून गारगोट्या एकमेकींवर आपटून भागणार नाही. त्यासाठी उपयुक्त अशी वातहि असणे आवश्यक असते. शिवाजी महाराजांचे हृदय सबंध देशातील लोकांशी स्वतःला जोडू शकले नाही. त्यामुळे त्यांचा उद्देश काहीही असला तरी त्यांचा प्रयत्न हा साऱ्या देशाचा प्रयत्न होऊ शकला नाही; आणि मराठ्यांनी सुरू केलेला हा उपक्रम परिणामी भारतातील इतर जमातींच्या बाबतीत लुटारूंचा भयंकर उपद्रव बनला....

"शिवाजी महाराजांनी 'हिन्दु समाजाची' मूलगत छिद्रे बुजवू शकेल अशा एखाद्या भावनेचा आधार घेतला नाही, किंवा तसा प्रचारहि केला नाही. आपला धर्म बाहेरून पीडित, अपमानित होत आहे, हा क्षोभ मनात बाळगून त्याला भारतवर्षात सर्वत्र विजयी बनविण्याची इच्छा धरणे, हे स्वाभाविक असले तरी ती इच्छा सफल होण्यासारखी नव्हती. कारण ज्या ठिकाणी धर्म हा आतूनच पोखरला जात आहे, धर्मामध्येच माणसाला केवळ विच्छिन्न व अपमानित करणारे सारे अडथळे विद्यमान आहेत, त्याठिकाणी तिकडे दृष्टिपातहि न करता, इतकेच काय पण त्यां भेदबुद्धीलाच मुख्यतः धर्मबुद्धी समजून त्या शतधाविदीर्ण धर्मसमाजाचे स्वराज्य या विशाल भारतवर्षात स्थापन करणे कोणाहि मानवाला शक्य नाही. कारण ते परमेश्वराच्या नियमाशी सुसंगत नाही. केवळ आघात झाल्यामुळे, क्रुद्ध होऊन, गर्व करून कोणतीहि जाति मोठी किंवा विजयी होऊ शकत नाही. जोपर्यंत तिच्या धर्मबुद्धीमध्ये अखंडत्वाच्या तत्त्वाला सक्रिय स्थान मिळणार नाही; जोपर्यंत मीलनाची शक्ति एखाद्या महान् भावनेच्या अमृतरसाने चिरसंजीवित होऊन सर्व दिशांची आतून बाहेरून तिला एकत्वाकडे नेणार नाही, तोपर्यंत बाहेरचा कोणताहि आघात व प्रतिभाशाली व्यक्तीची कोणतीहि वीरता तिला दृढ घनिष्ठ अथवा सजीव-सचेतन बनवू शकणार नाही.

सामाजिक समतेची जी नवी मूल्ये इंग्रजांच्या संपर्कामुळे भारतवर्षात प्रचलित झाली, त्यांच्या कसोटीवर तीनशे वर्षांपूर्वी होऊन गेलेल्या शिवाजी महाराजांच्या यशापयशाचे मूल्यमापन करणे कदाचित् काही लोकांना आवडणार नाही, परंतु सदर मूल्यमापनात दिसून येणारा आपलेपणा, जिव्हाळा व गौरवाची भावना लक्षात घेतल्यास त्यांना त्याबद्दल राग वाटणार नाही, अशी आशा आहे. ऐतिहासिक घटनांपासून योग्य तो बोध घेऊन आपल्या वैयक्तिक व सामाजिक जीवनात बदल घडवून आणण्याचे महत्त्व ज्याना पटते त्यांना रवीन्द्रनाथांनी केलेले हे तटस्थ मूल्यमापन आवडेल यात शंका नाही. शिवाजी महाराज हे केवळ महाराष्ट्राचे नव्हते. ते साऱ्या भारतवर्षाचे होते, या दृष्टिकोणातून आपण या मूल्यमापनाकडे पाहिल्यास साऱ्या जगाच्या प्रशंसेला पात्र झालेल्या एका महाकवीच्या अंतःकरणात शिवाजी महाराजांविषयी काय भावना होत्या हे जाणून घेताना खरोखरी आपल्याला आनंद व अभिमान वाटेल.

●●●












अनुक्रमणिका



# तार

**कलावंत आणि व्यसन, त्यातल्या त्यात अफू असेच समीकरण अगदी अलिकडच्या पन्नासपाउणशे वर्षातही आढळते. अशाच एका थोर कलावंताचा हा दर्दभरी किस्सा–**

**आपल्या** मुलाचे चित्त एकाच ठिकाणी स्थिर व्हावे, ते दुसऱ्या विषयात गुंतू नये, ऐन तारुण्यात थोर कलावंत म्हणून त्याचे नांव गाजावे अशा महत्वाकांक्षेने प्रेरित होऊन पूर्वीचे खानदानी कलावंत आपल्या मुलाना अगदी लहानपणापासून अफूचे व्यसन लावीत; त्यांच्या या सद्‌हेतूचे क्वचित् सुपरिणाम पण अधिक करून दुष्परिणाम खूप झाले. एकाच तारेत ठेवणे हा अफूचा मुख्य गुण असला तरी किंचित् मात्रा अधिक झाली की स्मृतिभ्रंशाचाही रोग जडतो. कलागुणाने मोठे पण अफूच्या अखंड सेवनाने माणसात नसलेले असे गवय्ये बजवय्ये पुष्कळ होऊन गेले. भूगंधर्व रहिमतखाँ हे यातील एक 'उत्कृष्ट' उदाहरण.

असे कलावंत म्हणजे सामान्य माणसांच्या करमणुकीचा विषय. त्यांच्या हातून होणाऱ्या चुका हा सामान्यांचा आसुरी आनंद असतो. त्याचा कलागुण किती मोठा आहे याकडे लक्ष द्यायची त्यांच्या मनाची प्रवृत्ती नसते. तो चुकला तर त्याला अधिकाधिक चुकविणे यातच त्याना समाधान लाभते.

बिब्बे खां नावाच्या एका उत्तम गायकाची गोष्ट. बिब्बे खां गायक म्हणून श्रेष्ठ पण दिवसभर अफूच्या तारेत राहाणारे. त्यामुळे आपण काय केले किंवा करतो आहोत याची जाण त्याना कधीच नसे. आपल्या मुलांवर त्यांचे फार प्रेम होते. एकदा एका सकाळी त्यांचा तीन वर्षांचा धाकटा मुलगा आपल्याला बाहेर फिरवून आणण्यासाठी हट्ट करू लागला. बिब्बे खांनी नशा केली होती पण तोपर्यंत ते तारेत पोहोचले नव्हते. मुलाचा हट्ट पाहून त्यानी त्याला आपल्या खांद्यावर बसवला आणि फिरवून आणण्याकरिता घराबाहेर पडले. जसजशी नशा चढू लागली तसतसे ते सुसाट चालतच राहिले. मुलाच्या डोक्याला उन्ह लागू लागले तसे ते पेंगत गेले, आणि थोड्याच वेळाने बापाचे केस घट्ट मुठीत धरून झोपीही गेले.

पाय दमले तसे बिब्बे खां थांबले. काहीतरी विचार करू लागले. आपण आपल्या मुलाला घेऊन बाहेर पडलो होतो हे त्याना आठवले; पण ज्याअर्थी मुलाचा हात आपल्या हाती नाही त्याअर्थी मुलगा कुठे तरी हरवला असावा असे त्याना वाटले. त्यानी त्याच्या नांवाने मोठमोठ्याने हाका मारायला सुरुवात केली. मुलगा जागा झाला, ओ देऊ लागला पण खांसाहेबाना त्याची ओ ऐकू येईना. मुलगा हरवला आहे ही एकच भावना त्यांच्या मनात व्यापून राहिली. ते बाजारपेठेत आले. तिथे हाका मारू लागले. जो समोर दिसेल त्याला विचारू लागले– "मिया, मेरा तीन सालका प्यारा लडका कहा गूम हो गया है, आप ने देखा तो नही ?"

झाले; बिब्बे खां नशेत आहेत हे ओळखणाऱ्या वात्रट माणसांचे फावले. त्यानी मुलाला या गल्लीत पाहिला, त्या बोळात पाहिला असे उगीच सांगून खांसाहेबाना घंटाभर घुमविले. शेवटी खांसाहेबांच्या शेजारी राहाणारा त्यांचा एक सारंगिया शागिर्द त्याना भेटला. त्याला घट्ट धरून आणि मुलगा हरवल्याची गोष्ट सांगून खांसाहेब ढसढसा रडू लागले. म्हणाले –"पांच रुपय्ये की मिठाई खिलाऊंगा बाबा, मगर मेरे प्यारे बच्चे को धुंडकर मेरे सामने ला दो !

त्या शागिर्दाला खां साहेबांच्या स्थितीची जाणीव झाली. त्याने खांद्यावरच्या मुलाला खाली घेऊन खां साहेबांच्या समोर उभा केला तेव्हा त्याना परमानंद झाला. जणू हरवलेला कुठून शोधून आणून दिल्यासारखा त्याला घट्ट जवळ घेऊन खां साहेब कुरवाळू लागले, शिष्याचे वारंवार आभार मानू लागले. आणि मुलाला म्हणतात– "अबे बेवकूफ, किती वेळ तुला मी हाका मारतोय, ओ द्यायला काय झालं होतं ? पुन्हा असा हात सोडून जाऊ नकोस बाबा !"

मुलगा बिचारा बापाच्या तारवटलेल्या धुंद डोळ्याकडे बघतच राहिला.

**–कानसेन**



सर्व बळ एकवटून...एकीने...जिद्दीने खेचून घेऊ.
परिश्रमांची पराकाष्ठा करून...प्रयत्नांचे समाधान व यशाचा निर्भेळ आनंद पदरी पाडून खेचत रहाण्याचे तंत्र आम्हाला सुरुवातीपासून साध्य झाले आहे.
'स्वस्तिक'ला रबर धंद्यातील अग्रस्थान प्राप्त होण्यापूर्वी—
एका छोट्या शेडमध्ये धंद्याची अल्पांशाने सुरुवात ...२५ वर्षांचा प्रदीर्घ अनुभव...तंत्रांचा सखोल अभ्यास...मालाची विक्रीपूर्व चाचणी...आणि याहीपेक्षा अधिक म्हणजे मनांतील जिद्द.
सहाजीकच आमच्या रबरी उत्पादनांचा दर्जा सर्वोत्कृष्ट आणि अजोड असणारच.
'स्वस्तिक'ची कांही रबरी उत्पादने—
होज पाइप्स, रबरी बुचे, ऑटो पार्टस्, ऑईल सील्स्, ॲडीझीव्हज्, हवामानविषयक बलून्स्, लॅटेक्स उत्पादने-उदा. हातमोजे (शस्त्रक्रीयेसाठीं, औद्योगिक व घरकामासाठी), रबर गमबूटस् आणि कॅन्व्हॅस बूटस् व इतर विविध पादत्राणे.
स्वस्तिक
स्वस्तिक रबर प्रॉडक्ट्स् लिमिटेड, खडकी, पुणे-३.
TOM & BAY SR/6685-M






मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास






# कथा कुणाची व्यथा कुणा



अरविंद विष्णु मुळगांवकर

**सहा** नंबर ट्रॅमचा खडखडाट नुकताच थांबला होता. तथाकथित सभ्य लोकांची वर्दळ कधीच संपली होती. क्वचितच् एखादा रसिक मनगटावरल्या मोगरीच्या गजऱ्याचा वास घेत घेत माडयांकडे बारकाईने पाहत रेंगाळत चालला होता. ठिकठिकाणी रंगीत नंबर असलेले पिवळे पांढरे गोळे दिसत होते. मधूनच कुठूनतरी घुंगरु काढून टाकल्याचा आवाज येत होता. मोठमोठया आरशांच्या भिंती असलेल्या सुलेमानच्या हॉटेलातून "एक पावना दो पैसा"च्या कर्कश्य आरोळया निघत होत्या. काऊंटरवर पत्र्याची टोकन्स् आदळली जात होती. बच्चुभाईच्या वाडीतील तंदुरी रोटीवाल्याने आणि द्वारकाप्रसाद दूधवाल्याने आपल्या भल्या दांडग्या शेगडया पाणी शिपडून नुकत्याच विझवल्या होत्या. अर्धवट विझलेले कोळसे, तंदुरी रोटी आणि करपलेल्या मलईचा संमिश्र खरपूस वास आसमंतात सुटला होता. आणि ह्याच वाडीमधून मध्यरात्रीच्या गडद शांततेचा भंग करणारी एक धुंद सुस्वर लकेर उमटत होती...

**या दिलसे बाज आजा**

**या दिल नबाज होजा....**

वाडीतल्या सर्व तवायफी गाऊन गाऊन थकल्या होत्या. फक्त अैनतबाईचा कसदार आवाज नव्या जोमात गुंजत होता. खास एका माणसासाठी. एका नामीग्रामी कलावंतासाठी. क्वचित्च गाणाऱ्या वयोवृद्ध अैनतबाई नझिरखाँ पानिपतवाल्यांच्या हट्टाला मान देऊन एक गोड गझल आळवीत होत्या. आवाजावर वार्धक्याची छाया होती पण कस मात्र अनुभवाचा होता. दुगणीच्या उठावाची थाप बायाँवर पडताच उरलेली सुरावट सारंगीये जीरेखाँ यांच्यावर सोपवून, त्या नझिरखाँच्या वीजेसारख्या चालणाऱ्या बोटांकडे पाहत मोठया कौतुकाने लग्गी ऐकू लागल्या.

"माशाल्ला– आपही बजाते रहिये. अब मैं सिर्फ सुनती रहूँगी" – दोघांनाही प्रोत्साहन देत अैनतबाई उद्गारल्या.

पण. . . पण, रंगलेली लग्गी अर्धवटच तोडून नझिरखाँनी तबला पुढे सरकवला. अर्थात् सारंगीही थांबली.

"अजि, क्या हुआ ? रुक क्यूं गये ?". . . अैनतबाईचा समाधीभंग झाला. किंचित् रोष आणि आश्चर्याच्या सुरकुत्या त्यांच्या चेहऱ्यावर उमटल्या.

"साहबान, केवळ आपली अदब राखण्यासाठीच मी तबल्याला हात लावला"— नझिरखाँ पानदान जवळ ओढीत म्हणाले.

"बेटा, मला काहीच कळत नाही. एवढी रंगतदार लग्गी अधुरीच कां सोडलीस ? काय झालं तरी काय ?"

"साहबान, काय सांगू ? पंधरा दिवस झाले तबल्याला बोट नाही लावलं. अल्लाहची कसम." नझिरखाँच्या डोळयात अश्रु तरळले. आणि एक दीर्घ निश्वास उमटला.

"आत्तापर्यंत एका बाटलीबरोबर अठरा घंटांचा रियाझ व्हायचा आणि आता नुसती शराबवरच जानमारी होतेय. जी चाहता है

"भाई नजीरखाँ तेरे ख़ातिर ये करीमबक्ष पेरना आजसे तबलेको हात नही लगायेगा"
.... आणि खरोखरच वयाच्या पंचाहत्तराव्या वर्षापर्यंतसुद्धा करीमबक्ष पेरवानी तबल्याला बोटं लावली नाहीत.

दरियामे डूब जाऊँ."

"माय स मत हो बेटा. तुला पैशाचीच फिकर असेल तर ती मी आत्ता दूर करीन."

बाई डोळ्यांना पदर लावत म्हणाल्या.

"जी ! बिल्कूल नाही. पैशाचा मला कधीच शौक नाही. . . ती मेहफील, माझी जिंदगी बरबाद करणारी ती मेहफील याद आहे तुम्हाला ? कदाचित् तुम्ही हजर नसालही त्यावेळी. पण तुम्ही ह्यावद्दल ऐकलं नक्कीच असेल. साहवान, काय सांग ? माझी जान घेतलीय त्या मेहफलीने जान. थांबा. तुम्हाला सुरुवातीपासूनच सांगतो . . . .

माझा स्वभाव मुळातच झगडालु. आतापर्यंत असा एकही तबलिया राहिला नाही की जो माझ्याशी मुक़ावला करू शकला. हिंदुस्थानातल्या सर्व तबलियांच्यावर मी तवला वाजवला. मला तबल्याची नशा चढली होती. अगदी शरावी नशेसारखी. जिथे जाईन तिथे माझी मान नेहमी ताठ राहिली. माझ्या तवल्याला तोड नव्हती. कराचीचा तो करीमवक्ष पेरना मला अजूनही याद करतो. तो तर पंजावचा बादशहाच. ओघाओघात आठवलं म्हणून सांगतो. मी कराचीला गेलो असतानाची गोष्ट. एका मेहफलीत एका गवैय्याची साथ करत एक वृद्ध बसला होता. गवैय्यानं एका विषम तालातली बंदीश गायला सुरुवात केली. चिजेचं तोंडसुद्धा त्या तबलियाला नीट पकडता आलं नाही. आणि ठेका कसाबसा लावला तोसुद्धा चुकीचा. गवयी एकदम खट्टू झाला. त्याला पुन्हा पुन्हा ठेका समजावून देऊ लागला. पण ह्या जनाबांच्या डोक्यात काही केल्या शिरेना. मला राहवलं नाही— मी म्हणालो – "अगर आपको तालमे बजाना याद नही तो तबलेको हाथही क्यूँ लगाते हो ?" —आणि मी त्याच्या जवळून तबला जवळजवळ हिसकावूनच घेतला. म्हातारा वरमला आणि दातओठ खात काहीतरी पुटपुटत उठून गेला. नंतर मी त्या गवैय्याची संगत केली.

दुसऱ्या दिवशी मी लाहोरला जायची तयारी करत होतो. इतक्यात दोन माणसे करीमवक्ष पेरनाचा निरोप घेऊन आली. करीमवक्षाचं नांव मी खूप ऐकलं होतं पण त्याला पाहिलं मात्र नव्हतं. मी त्यांच्याबरोबर गेलो. एका बैठ्या घराबाहेर खाटल्यावर काही मंडळी हुक्का ओढीत बसली होती. त्यातच मला तो कालचा म्हातारा दिसला. मी जरा चमकलोच. इतक्यात आतमधन एक उंचापुरा, गोरापान तरुण आला. माझ्याबरोबरच्या माणसाने त्याची ओळख करून दिली. हाच करीमबक्ष. मी खोलीत शिरलो. तबलावायाँच्या दोन जोड्या समोरासमोर ठेवल्या होत्या. आणि एक सारंगिया गज परजत बसला होता.

"जनाव कल आप तालके बारेमें बडीबडी बातोंमें हमारे उस्तादको छेडते रहे ! क्यूँ ? हमारे उस्ताद काफी उम्रके हो चुके है इसलिये? अगर नामुराद न हो तो हमारे जैसे जवानोंसे आमने सामने मुकाबला करना — आप बोले वो तालमें मैं अगर तबला न बजाऊँ, तो ये मूँछ मुंडवा दुंगा और आपका गंडाबांध शागरदि बनुंगा, समझें ? "

मी चकितच् झालो. म्हणजे कालचा हा बुढ्ढा ह्या करीमबक्षचा उस्ताद होता तर ! माझे हात फुरफुरतच होते – मी तबला पाहिला. दोन्ही तबले सारंगीशी आधीच मिळवलेले होते. . .आणि जवळ जवळ दोन तास आमची जुंपली. करीमबक्ष तर लाजवाब तय्यार होता. लागलीच नग्मेवाल्याला त्याने तेरा मात्रांचा नग्मा पकडावयास सांगितले आणि पश्तुमध्ये बांधलेल्या अप्रतिम गती वाजवण्यास सुरुवात केली . . .मला घाम फुटला. हा माझ्यावरचा पहिलाच प्रसंग. मी लागलीच तबला पुढे सरकवला. आणि त्याचे पाय धरले. . . . .

"हाँ हाँ हमारे नही – हमारे उस्तादके."

करीमबक्ष कुडत्याच्या टोकानं घाम पुसत म्हणाला. मी त्यांचेही पाय धरून माफी मागितली. आणि सुन्न मनानं परतलो. निरनिराळ्या विषम तालात तबला कसा वाजवता येईल ह्याचाच घोर जिवाला लागून राहिला. एक दिवस कुणीतरी म्हणालं हिंदुस्थानात तालांचा हिसाब शिकवणारा फक्त एकच तबलिया आहे– कोण तर म्हणे मुंबईचे मुनीरखाँसाहेब. . अखेरीस मी मुबईला आलो. नवा. नवा. एक जुना दोस्तगार भेटला. म्हणाला – "अहमदजानचा तबला ऐकलास ? " मी मान उडवून म्हणालो, "उफ्– किस झाडकी पत्ती ! " पण खरं सांगायचं तर मला त्याचाही तबला ऐकायचा होता. खूप नांव ऐकलं होतं अहंमदजानचं. सगळे म्हणायचे, बडा तगडा बजाता है अहंमदजान. खुबसूरत हत्ते – दायाँ बायाँ ऐसा गुंजता है की वाह – सुभानल्ला ! आणि माझ्या मनातल्या मत्सराच्या ठिणगीनं पेट घेतला. अहंमदजानवर तबला नाही वाजवला तर नावाचा नझिरखाँ नाही. धगधगत्या ईर्षेत अख्खी रात्र आणि दिवस गेला.

☆ ☆

रमझान ईदची धामधूम नुकतीच आटोपली आणि अकबरीबाईंकडचं बोलावणं मला आलं. मी सज्जातूनच पाहत राहिलो. मेहफलीचा थाट काही औरच होता. अख्ख्या दिवाणखान्यात गाद्या पसरलेल्या होत्या. पांढऱ्याशुभ्र चादरींनी त्या व्यवस्थित झाकल्या होत्या. दोन भव्य आरशांमध्ये एका जाड नि मोठ्या गादीवर एक इराणी ग़ालिचा अंथरला होता. तक्के आणि लोड त्यावर मोठ्या दिमाखानं विसावले होते. जवळच एक चकचकीत नि नक्षीदार पानदान ठेवलं होतं. कोपऱ्यात







ठेवलेल्या निखाऱ्यांवर जळणारा धूप मेहफीलचं वातावरण निर्माण करण्यात गुंग झाला होता. एक वयस्कर गृहस्थ तक्क्याला टेकले होते. जरबदार नजर. मिशा बारीक आणि अर्धवट पिकलेल्या. अंगात शेरवाणी–सुरवार आणि डोक्यास साफा. बांधा शेलाट्यात जमा. एक मला दिसलं. ह्या जनावांची बोटं बिल्कूल स्थिर नव्हती. त्यांच्या नकळतच ती एकसारखी हलत होती. मधूनच डाव्या हाताने मांडीवर थापा पडत होत्या – आणि उजव्या हाताच्या बोटांनी मात्रांची गिन्ती चालली होती. बाजुला बसलेल्या अहंमदजानला काही बोल समजावून सांगण्यात मधूनच ते दंग होत आणि त्यांच्या चेहऱ्यावर लागलीच निर्मितीच्या आनंदाची छटा झळके. मी अंदाज केला बहुतेक हेच मुनीरखाँ असावेत आणि हा अंदाज खराही ठरला. कुठूनतरी बरीच मंडळी दिवाणखान्यात आली. त्यातल्या एकाने एका रुबाबदार व्यक्तीशी त्यांची ओळख करून दिली... "आप है मशहूर तबलानवाझ मुनीरखाँसाहब..."

थोडयाच वेळात दिवाणखाना गच्च भरला. साज मिळावला जाऊ लागला. तबल्यावर हातोडीचे आघात होऊ लागले नि सारंगीच्या खुंट्या पिरगळल्या जाऊ लागल्या. बसलेल्यांपैकी जवळजवळ सगळे तबलियेच वाटत होते. हो, आम्ही तबलिये दुसऱ्या तबलियांना ताबडतोब ओळखतो. मला कुणीच ओळखत नव्हतं. मी डगमगलो नाही. दिवाणखान्यात शिरलो, अहमदजानला तडक गाठलं. म्हणालो, – "सलाम आलेकुम, भाईजान, मैं हूँ नाझिरखाँ पानिपतवाला. आपको सुननेके लिये लंबा सफर करके आया हूँ. बडा नाम सुना है आपका."

"आलेकुम सलाम नाझिरखाँसाहब, हमसब आपहीकी राह देख रहे हो. बडी खुषी है गयी – आप है हमारे उस्ताद मनीरखाँसाहब."

"वाह वाह — आपका नाम कौन नही जानता? अगर नही, तो वह तबलियाही नही" — मी उस्तादांच्या पायाला स्पर्श केला आणि त्यांची खैरीयत विचारली. "बेटे, तुम्हाराभी नाम हमने कम नही सुना. ये सब बच्चे कहने लगे उस्ताद, हमें नाझिरखाँको सुनना है – इसलिये खास आपको बुलावा भेजा गया. ये सब हमारे शागरिद हैं. यह है लाला – अमीर हुसेन, यह है गुलाम हुसेन, शमसुद्दीन, हबीबउद्दीन, विष्णुजी सब एकसे एक आला दर्जेका तबला बजाते हैं."

"अच्छी बात! हम ज़रूर सुन लेंगे. लेकिन एक बात पहलेही बता देता हूँ – मी जोरात म्हणालो – नाझिरखाँका तबला आजतक किसी तबलियेके पहले नही बजा. सिर्फ आखरीमे. समझो. आजतक कोई तबलिया मेरे बाद तबला नहीं बजा सका. आप सबको ज़रूर सुन लुंगा लेकिन मेरे बजानेसे पहले."

अहंमदजानचा चेहरा रागाने लालबुंद झाला. कपाळावरची नस अन् नस त्वेषाने तटतटली. मोठ्या मुष्किलीने स्वत:ला आवरीत तो म्हणाला,

"माफ करना. मैंने भी आजतक किसी तबलियेके पहले तबला नहीं बजाया. मेरा तबला हमेशा उपरके दर्जेपे कायम रहा. मैं तो बादमेही बजाऊँगा." आणि लगेच उस्तादांकडे वळून म्हणतो–

"बाबा, मेरी तबियतभी आज ठीक नही है. आज लालासेही बजवा लेना."

"अबे चुप. तेरी तबियत साफ कर दूंगा. चल ले तबला." मुनीरखाँसाहेब तापलेल्या करड्या आवाजात म्हणाले.

"उस्ताद, अगर बजाऊँगा तो बादमें. पहले इनका सुनना है – नाझिरखाँका."

"लाहौल वला कुवत. अबे बकवास बंद कर. चल उठाव अगल. नाझिरखाँ मेहमान है अपने – बंबईके." — मुनीरखाँसाहेबांचा पारा वर चढत होता. अहंमदजानचा चेहरा पडला. तो मोठ्या नाखुषीनंच उठला. माझ्या मनासारखं झालं...

काळी चारचा मोठ्या तोंडाचा तबला आला. एक मोठा सुपारीघाटाचा बायाँ आला. अहंमदजानने आपली शेरवाणी उतरवली. मलमलीच्या कुडत्याच्या अस्तन्या वर गेल्या. पायाला स्पर्श होऊन उस्तादांची इज़ाज़त घेतली गेली. उजव्या हाताचं बोट तबल्याच्या लवेवर लवमात्र लागून कपाळावरून डोक्यावर गेलं आणि पुन्हा एक दोन घरं लावून तबला ठीक मिळवला गेला. सगळीकडे एकदम शांत झालं. सुरमा घातलेली नजर सर्वांवरून मोठ्या दिमाखानं फिरली आणि क्षणमात्र माझ्या नजरेला भिडली.

"ग म ध नि सा..." चंद्रकंसचा मधुर नग्मा सारंगीतून बोलू लागला. लय नि:पक्षपातीपणे संभाळत...

"धेत् धेत् धीटतीट कड्धातीट धागेतीट.." एक तिहायी मध्य लयीत वाजून समेपासून एकदम चौपटीत गेली आणि निमिषार्धात सम पुन्हा हाजीर!

"वाह् वाह्! सुभानअल्ला! क्या कहने! वाह!" कानाकोपऱ्यातून दाद आली.

"रुक जाइएगा जनाब"—मी अचानक हुकमी स्वरात म्हणालो.

अहंमदजानचा तबला मध्येच थांबला – आणि सर्व मेहफलीचे डोळे माझ्याकडे लागले.

"लगता है आप बुजुर्गोंका कहना नही मानते" – मी म्हणालो.

"मतलब?"—अहंमदजान कपाळाला आठ्या घालीत म्हणाला.

"बुजूर्गोंका कहना है की तबलेकी शुरु पेशकारसेही हो जाय और आपने पेशकार तो बजायातकभी नही."

"माफ करना जनाब, पेशकारेकी जरूरत उन तबलियोंको होती है जिनका तबला हत्ते गरम किये बगैर नहीं बजता. अठारह घंटोंका रियाझ करनेवाले हम हमेशा गरम तबला बजाते आये हैं. और पेशकारका मतलब सभीं जानतें हैं. पेशकार याने जो पेश किया जाता है. मतलब मेरा पूरा तबला पेशकारही है."

मी काहीसा निरुत्तर झालो.

"नझिरखाँसाहब, बजानेवाले कलाकारको बीचमेंही टोकना मुनासिफ़ नही. आपको जो कुछ कहना है वो मेहफील खत्म होनेके बाद." मुनीरखाँसाहेबांनी मला चापलं.

आणि मग... पेटलेल्या अहंमदजानने दिल्लीचे अस्सल कायदे एकामागून एक वाजवायला आरंभ केला.

"धिट् धाग धिनगिन धिट धाग् धिनगिन् धिट धिट...

आणि साहबान काय सांगू? "धीट धीट" ह्या बोलांकडे बोलणारी बायाँची गुंज मी अख्ख्या जिंदगीभर ऐकली नव्हती. किनार तर इतकी आँसदार मी पहिल्यांदाच ऐकली. खरोखरच कुदरती हात. मधूनच तेराव्या मात्रेकडे वाजवलेली सुरेल तबल्यावरची थाप माझ्या हृदयाचे ठोके थांबवू लागली. अहंमदजानने आपली सगळी जान दायाँबायाँत ओतली होती. मधूनच एखादा दाणेदार रेला रव निर्माण करत निघून जायचा सगळ्या मेहफलीची दाद घेत. अहंमदजानच्या लांबसडक बोटांना तबला बायाँ अक्षरशः घाबरत असावा. गुंजदार बायाँ, आँसदार दायाँ, अतिशय सुस्पष्ट बोल आणि विद्वत्ता ह्या सर्वांचा इतका अपूर्व मिलाफ मी आजच पाहत होतो. आणि ऐकता ऐकता माझा आत्मविश्वास ढासळत चालला होता. ह्या तबल्यावर मी काय वाजवणार? माझी मजाक तर उडवली जाणार नाही? कदाचित् तबला हातात आल्यावर मी सर्वांना अहंमदजानचा तबला विसरायला लावीन. मनाच्या कोपऱ्यात दडलेला अभिमान मला प्रोत्साहन देऊ पाहत होता.

इतक्यात लय दुपटीने वाढली. माझ्या तंद्रीचा भंग झाला. अहंमदजानने खड्या आवाजात फरुखाबादी चलन म्हणण्यास सुरुवात केली. तेच वाजवताना समेशी लपंडाव खेळत खेळत त्याने सर्वांवर जादु घातली. समेसमेला माना झटक्यात खाली झुकत होत्या. आणि बोलाबोलाला येणारी उत्स्फूर्त दाद प्रत्येक श्रोता मोठ्या मुष्किलीने ओठांपर्यंतच येऊ देत होता. एका गुंजदार रव असलेल्या रेल्यात एकापेक्षा एक बेहतरिन गती गुंफल्या जाऊ लागल्या.



हेचि सिंहासन। देई मज दैवा।
वाजवीन पांवा। कर्तृत्वाचा ॥

पहिलीच फरद गत मियाँ हाजीसाहबांची –

"धगत्तकीट धातिरकिटतकृतेत्..."—

मुनीरखाँसुद्धा सर्वांनी कानाला हात लावले. माझासुद्धा हात कानाकडे वळला. मियाँ शलारीखाँ, मियाँ बक्षुजी, मियाँ कालेखाँ, चुडियाइमाम बक्ष वगैरे बुजुर्गांची दर्जेदार गतपरने वाजू लागली. मला याद नसलेल्या ह्या अप्रतिम कविता माझं हृदय पिळवटून टाकत होत्या. एवढं दुःख मला आजवर कधीच झालं नव्हतं. आजपर्यंत माझ्या रियाझी तबल्यामुळे अनेक तबलियांवर पश्चात्ताप करण्याचे प्रसंग ओढवले होते. पण आज तो प्रसंग माझ्यावर आला होता. कधी नाही ते अल्लाहचं नाव मला आठवू लागलं होतं. मला हे सर्व सहन होईना. मी उठलो आणि मेहफलीबाहेर पडलो. दरवाजात कुणीतरी मला हटकलं. मी म्हटलं, "जी! अभी आया पेशाब करके" मी खाली उतरलो आणि नंतर हे काळं तोंड घेऊन पुन्हा मेहफलीत शरीक झालोच नाही.... तेव्हापासून माझी झोप उडालीय. कधी डोळा लागलाच तर अहंमदजानची विजयी मुद्रा डोळ्यासमोर दिसते. मेहफलीतले इतर लोक माझ्याकडे बोटं दाखवत कुचेष्टेने हसत असलेले दिसतात.

अखेरीस मी निश्चय केला की तबला शिकेन तर मुनीरखाँसाहेबांकडेच नाहीपेक्षा तबला वाजवणं सोडून देईन. तेव्हा कुठे मला शांत झोप लागली.

मी दुसऱ्याच दिवशी मुनीरखाँसाहेबांना रस्त्यात गाठलं–

"आलेकुम सलाम. कहाँ गायब हो गये थे कल?"

"खाँसाहेब, गुस्ताकी मुआफ करना. अगर सच बताऊँ तो मेरा तबला वहाँ नही जमता. इसलिये मैं पेशावका बहाना करके वहाँसे भाग गया. अब मेरा दिल नही लगता तबलेको छुनेको. सिर्फ एकही तमन्ना है कि आपसे तबला याद कर लूँ. आप ना मत कहियेगा खाँसाहब, नही तो ये जान चली जायेगी."

"जी नही, यह नही हो सकता. जो हमारे बच्चेकी इज्जत लुटने आया था उसे मैं हरगीज़ नही बताऊँगा."

"लेकिन खाँसाहब?....."

"हट जाइये मेरी आँखोके सामनेसे. मैं आपकी शक़लतक देखना नही चाहता."

एवढं ताडताड बोलून मुनीरखाँसाहेब दृष्टिआड झाले. आणि माझे पाय गुत्त्याकडे वळले. शराबच्या पुन्या दोन बाटल्या झोकल्या तरी नशा चढेना. नाना तऱ्हेचे भयंकर विचार मनात गर्दी करू लागले. त्याच स्थितीत मी खोलीवर आलो...आणि... आणि माझा आवडता साज हातोडीने फोडून तोडून टाकला. त्या दिवसापासून रोज मी नशेत राहून माझं दुःख विसरण्याचा फोल प्रयत्न करतो आहे.

"बेटा, खरंच तुझा किस्सा कुणाचंही हृदय हेलावून सोडणारा आहे. पण तू आशा सोडू नकोस. तुझी एवढी जर इच्छा आहे तर अल्लाहतालाह नक्कीच तुझ्या मनासारखं करील. मीसुद्धा दुवा मागीन त्याच्याकडे. पण एक प्रयत्न मात्र करता येण्यासारखा आहे. उद्या संध्याकाळी सहाच्या आधीच तू माझ्याकडे ये. अगदी न विरसता."

मला ह्या रात्रीही झोप लागली नाही. अैनतबाई कोणता प्रयत्न करणार आहेत हे एक कोडंच होतं.

☆ ☆

"एक कदम आगे मत उठाइयेगा" – अैनतबाई दरवाजातच उभ्या राहून ओरडल्या.

धीरगंभीर चालीने माडी चढत असलेल्या मुनीरखाँसाहेबांनी चकीत होऊन वर पाहिलं. अैनतबाई रागानं थरथरत उभ्या होत्या.

"आज से यह दरवाजा आपके लिये बंद रहेगा." लालबुंद चेहऱ्याने — थरथरत्या स्वरात बाईसाहेब उद्गारल्या. निमिषार्ध काय झालं आहे ह्याचा उलगडा खाँसाहेबांना काही केल्या होईना. जिना चढून लागलेली धाप किंचित् ओसरल्यावर घसा खांकरून खाँसाहेब म्हणाले —

"क्यूं जी? क्या हो गया? मुझसे इतनी नाराज क्यूं हो गयी? मुझसे कोई क़सूर तो नहीं हुआ?"

"बिल्कूल! बताती हूँ. एक अच्छासा लड़का आपका शागीर्द बननेके लिये कइ दिनोंसे तडप रहा है – रो रहा है – और आप उसे सामनेतक खडे नहीं करते? बडी अजीब बात है! जबतक आप उसे शागीर्द बनानेका वादा मुझसे नही करते तबतक यह कमरा आपके लिये खुला नही" – बाईनी दरवाजा खरोखरच धाड्दिशी लावून घेतला.

खाँसाहेब वर आले. दरवाजा वाजवून ओरडू लागले – "अजि, अजि, सुनो तो सही, मेरी बात तो सून. लो. मैने वादा किया. अभी तो खोल दरवाजा?"

आणि....गंडाबंधनाचा तो थाट पाहून खाँसाहेब अधिकच बुचकळचात पडले.

"बेटे नझिर, यहाँ आजा"....

आतून नझिरखाँ आले.

"पैर छुओ इनके...अब बोलो..आजसे किसीसे झगडा नही करूँगा. किसीकी इज्जत नहीं लुटूंगा...बोल, बोल."

नझिरखाँनी खाँसाहेबांचे पाय धरले.

खाँसाहेबाना गहिवरून आलं.

☆ ☆

गंडाबंधन ओटोपल्यानंतर परतताना नाझिरखाँचा गळा दाटला होता. ते सद्गदीत होऊन म्हणाले – "साहबान, आपका अहसान जिंदगीभर नहीं भुलूंगा – आप मेरी माँकी जगह है...शुक्रीया खुदा हाफिज."

ह्या गोष्टीला पुरी सातआठ वर्षंसुद्धा झाली असतील. नसतील... नाझिरखाँचं नाव सगळीकडे झालं होतं. मुनीरखाँचे ते एक आवडते शागीर्द बनले होते. आणि..शेवटी तो क्रूर दिवस उगवला. कल्पनातीत रियाझ आणि दारुचं अतिसेवन ह्यामुळे नझिरखाँ साहेबांचा अंतकाल झाला...मुनीरखाँसुद्धा प्रत्येक तबलिया ढसढसा रडला. तबलियांमधली जान हरपली. ऐनतबाईंच्या कोठीवर बरीच मंडळी जमली होती. मुनीरखाँ, अहमदजान आणि कित्येक नामी कलावंत. एक उंचापुरा, गोरापान माणूस रडत रडत बोलत होता....

"क्या कहूं–? हमारी और उनकी बार बार मुलाक़ात हो गयी...कराचीके वह किस्सेनेही हमारी उनकी दोस्ती बना दी, मेरा छोटा भाई! उपरवाले की भी कमाल है. कभी कभी वह बेवकुफ बनता है और अच्छो अच्छो को चून चूनके ले जाता है...अब मेरे हाथोंकी भी जान चली गयी. अब मेरा तबला किसके साथ बजेगा...लो...भाई नाझिरखाँ — तेरे खातिर ये करीमबक्ष पेरना आजसे तबलेको हाथ नहीं लगायेगा"

आणि खरोखरच आज वयाच्या पंचाहत्तराव्या वर्षापर्यंतसुद्धा करीमबक्ष पेरनांनी तबल्याला बोट लावलं नाही!

●●●

**वीडशे वर्षांमागे संगीत विषयाबद्दल अमेरिका व युरोपमधील देशांच्या लोकांची वृष्टी, सध्या आपल्या देशात आढळून येते, तशीच अनुदार होती. सद्गुणांच्या वाढीस संगीत सहाय्यभूत होईल हे गृहीतक शंकातीत नाही. असे लोकमत प्रचलीत होते. परंतु बोस्टन् बोर्ड ऑफ एज्युकेशनने नेमलेल्या समितीने जे प्रतिवृत्त सादर केले त्यामध्ये असे मत प्रदर्शित केले :**

It is of hundred-fold importance for all true purposes of life to feel rightly than to think profoundly. Through Vocal Music you set in motion a mighty force which silently but surely in the end will humanize, refine and elevate a whole community.

अनुक्रमणिका






# अवगुनि क्या ज्याने गुन की सार?

— दरबारखाँ



**अनादि मी, अनंत मी, सूर मी, स्वरही मीच असे मानणारे हे फॅशन श्रोते! बिचारा तानसेनहि त्यांच्या तडाख्यातून सुटला नाही. मग हल्ली तर काय?**

**बडे भाई सो बडे भाई, छोटे भाई सुभानअल्ला!**

**'फॅशन** श्रोते' नांवाची एक जात अलीकडच्या काही मैफलीना बहुसंख्येने उपस्थित राहात असते. थिएटरात होणाऱ्या जलशाना या जातीतले लोक बहुधा पहिल्या पांच सहा रांगा अडवीत असतात. संगीताचे इंद्रिय याना नसतेच. परंतु अर्धी रात्र कुठे तरी आणि कशीवशी घालवायची म्हणून सुंदर सुंदर कपडे करून अत्तरांचा घमघमाट सोडीत जलसा सुरू झाल्यावर तासा अर्ध्या तासाने यातील कित्येक स्त्री पुरुष थिएटरात प्रवेश करीत असतात. त्यांच्या हातात 'पॉपकॉर्न'चे पुडे आणि चॉकलेटची पाकिटे असतात. गवयी जीव तोडून गात असतो आणि हे लोक तन्मय होऊन खात असतात. आपले अस्तित्व दाखविण्याकरिता उगीचच आहाहा, वाहवाचे नको त्या ठिकाणी जल्लोष करतात. विनाकारण टाळ्यांचे गजरही करतात. अर्थातच हे लोक म्हणजे ठेकेदाराचा एक मोठा आधारही असतो. मोठ्या दराची तिकिटे त्यानीच खरेदी केलेली असतात. मर्मज्ञ लोक—दुर्दैवाने—पास मिळवून आलेले असतात. त्याना पंधरासोळा रांगा सोडून कुठेतरी कोपऱ्यात बसविले जाते.

काही दिवसांपूर्वी बिर्ला थिएटरात सतारनवाज विलायत खांसाहेब यांचा कार्यक्रम होता. सुरुवातीपासूनच अतिशय रंगात येऊन खां साहेबानी एक राग व एक ठुमरी अशी वाजविली की, कोणत्या तरी ईर्षेने आणि मनात धुमसत असलेल्या अपमानित घटनेचे उट्टे ते त्या दिवशी सव्याज फेडत होते. 'यमनकल्याण' त्यानी असा वाजविला की ज्याचे नांव ते. कित्येक दिवसानी त्यांचे असे वजनदार वादन ऐकायला मिळत होते. मध्यंतरानंतर या जलशाचे ठेकेदार आणि इतर काही प्रतिष्ठित मंडळी खांसाहेबाना भेटायला आत आली आणि खांसाहेबाना काय हवे नको ते विचारायला लागली. खां साहेब म्हणाले—

"मित्र हो, मला काही एक नको; फक्त एकच करा, दहा पंधरा रांगाच्या पलीकडे काही तज्ज्ञ मंडळी बसलेली मला दिसताहेत. त्याना एकदम पुढे आणून बसवा म्हणजे मी काही तरी विचारपूर्वक आणि बरे वाजवीन. कृपा करा! नको त्या ठिकाणी उगीचच दाद देणारे हे पुढचे श्रोते पाहून माझं सतारीत लक्ष लागेनासं झालेलं आहे!"

व्यवस्थापकानी खास खुर्च्या टाकून त्या रसिकाना पुढे आणून बसविले आणि केवळ त्यांच्याकडून सच्ची दाद घेत खांसाहेबानी मध्यंतरानंतरचे वादन केले.

फॅशन श्रोत्यांची ही परंपरा केवळ आजचीच नाही, ती अतिशय जुनी आहे. अकबराच्या दरबारातली एक गोष्ट अशीच सांगतात. संगीत सम्राट तानसेनाना त्या वेळच्या फॅशन श्रोत्यानी असेच भंडावून सोडलेले होते. दरबारातील सरदार दरकदार आणि त्यांची पाहुणे मंडळी यानी तानसेनची मैफल गच्च भरून जाई. अकबरबादशहा तर संगीताचा जाणकारच होता. तानसेननी आलापी सुरू केली की काळीज हालविणारा एखादा स्वर लागला की, बादशहा 'वाह' अशी दाद देई. 'राजा बोले दळ हाले' या न्यायाने बादशहाने 'वाह' अशी दाद द्यायचा अवकाश की, लागलीच दरबारातील सारे सरदार दरकदार आणि त्यांचे पाहुणे वाह वाहचा जल्लोष करीत.

पुढे परिणाम असा झाला की, बादशहा वाह म्हणो न म्हणो वाह म्हटल्याने रसिकपणा व्यक्त होतो किंवा समजदारीचा मान मिळतो हे लक्षात आल्यानंतर वाहवाचा जल्लोष करण्याची एकाहून एकाची चढाओढच लागून राहिली. या चढाओढीची परिणती इतपर्यंत गेली की, तानसेनने दरबारात पाऊल ठेवले की, 'वाह', बैठकीवर बसले की 'वाह', तंबोरा हातात घेतला की 'वाह', छेडला की 'वाह', सूर लागला की 'वाह'—गाण्याऐवजी वाहवाचाच गजर होऊ लागला. या गोष्टीचा तानसेनला इतका कंटाळा आला की, हे वाहवाचे कंठवादन कसे थांबवावे हे त्याला कळेना. वैतागून गेलेल्या तानसेनने एका दिवशी ही गोष्ट आपला मित्र बिरबलाच्या कानावर घातली.



अनुक्रमणिका




'एकता'रीचीही। तुटली गा तार।
आता तरी तार। मतदारा ॥

बिरबलानी बादशहाशी संगनमत करून एक कट रचला. दुसऱ्या दिवशी नेहेमीप्रमाणे मफल श्रोत्यानी भरून गेली पण श्रोत्याना आज एक वेगळेच वातावरण मैफलीत दिसले. असंख्य खड्गदारी शिपाई श्रोत्याइतक्याच संख्येने आज मैफलीत हजर होते. हे एवढे शिपाई मैफलीत कशाला हे कुणालाही कळेना इतक्यात बादशहाचे आगमन झाले. अलकाबाचे पुकार झाले. सारे सोपस्कार झाले. बादशहा स्थानापन्न झाला. मैफल सुरू होण्याआधी बादशहाच्या हुकुमाने एक फतवा वाचन दाखविण्यात आला.

"सावधान ! मैफलीसाठी जमलेले सरदार, दरकदार, मानकरी आणि इतर श्रोते हो, आता थोड्या वेळाने मैफल सुरू होईल; पण लक्षात ठेवा की, मैफल चालू असताना किंवा ती संपेपर्यंत जो कोणी वाहवा देईल त्याचे शीर शहेनशहाच्या आज्ञेने तत्क्षणी धडापासून वेगळे करण्यात येईल. तुमच्या मागे असलेले खड्गधारी शिपाई तुम्ही पाहाताच आहात. सावधान. . . . !"

जो तो श्वास अवरोधून गप्प बसला. हूं नाही की चूं नाही. गाण्याकडे कुणाचेही लक्ष नव्हते. गाण्यातले काही उमगले म्हणून नव्हे, पण न जाणो सवयीप्रमाणे उगाचच तोंडातून 'वाह' अशी अक्षरे उमटली तर शीर जाईल या भीतीने प्रत्येकाच्या पोटात गोळा उठलेला होता. आलाप झाले; ध्रुपद सुरू झाले आणि बढतीच्या वेळी एक तान अशी गेली की, मैफलीतील एका रसज्ञ श्रोत्याला राहवले नाही. त्याने बेभान होऊन दाद दिली "वाहवा !" आणि झटकन् एका खड्गाचा हात वर गेला. सगळ्यांच्या भयभीत नजरा त्या ठिकाणी स्थिर झाल्या. रक्ताची चिळकांडी दिसू नये म्हणून कित्येकानी आपले डोळे गच्च मिटूनही घेतले. काहीनी जिथल्या तिथे माना खाली घातल्या. खड्गाचा हात वर होऊन बादशहाच्या आज्ञेची वाट पाहात स्थिरावला होता. हुकुमशहाची आज्ञा होण्याचा अवकाश की, निमिषात तो आपले कर्तव्य बजावून मोकळा होणार होता. रक्तपिपासू खड्ग तहानेने व्याकूळ झालेले होते; परंतु "ठहरो ?" असा घनगंभीर आवाज शांतता भंग करीत उठला. सगळ्यांच्या नजरा वर झाल्या.

"वाह देनेवाला सामने आ जाय !"

शिपायानी बखोटीला धरून त्याला बादशहासमोर उभा केला. तो थरथर कापत होता. आपला मृत्यु आता अटळ आहे या भावनेने कसायासमोर उभ्या असलेल्या बकऱ्यासारखी त्याची स्थिती झालेली होती. 'माझ्या आज्ञेचा भंग करणाऱ्या या इसमाला एका घावात मारण्याऐवजी याचे राई राई एवढे तुकडे करून मारा' असा हुकूम बादशहाकडून दिला जाईल अशी त्याची कल्पना झाली होती; पण घडले उलटेच. त्याला तशाच स्थितीत उभा करून मैफलीला उद्देशून बादशहा म्हणाला—

"ज्या रसिकतेला मृत्युचंदेखील भय नाही ती सच्ची रसिकता ! मृत्यूच्या भयाने तुम्हा सर्वांच्या दातखिळचा एकदम बसल्या. विलक्षण रंगलेल्या तानसेनच्या आजच्या गाण्याला तुमच्यापैकी एकालाही दाद देता आली नाही. एरवी अथपासून इतीपर्यंत एकसारखा वाहव्वाचा जल्लोष करणारे आणि गायकाला कंटाळा आणणारे तुम्ही किती तकलादी आहात याची आज जाणीव झाली. खरा रसिक हा की, ज्याला आपल्या पाठीमागे साक्षात मृत्यु उभा आहे याची जाणीव असून देखील—तानसेनच्या गळचातून बेभान करणारी स्वरमालिका स्रवताच—तो स्वतःला विसरला. त्याच्या सच्च्या दिलाने दाद दिली ! हे रसिका, ये असा मैफलीच्या समोर बस. तुला गुन्हा माफ आहे !"

बादशहाचा हा निर्णय ऐकून समागृहातील सर्व फॅशन श्रोत्यांचे चेहरे कसे झाले असतील याची कल्पनाच केलेली बरी !

• • •

नवसंगीत शोधण्याच्या भरात मूर्त्यांची जागा तोडग्यांना दिली जाण्याचा घोटाळा सुरू झाला आहे.....
कालची कला व आजची कारागिरी यात कालची कलाच श्रेष्ठ आहे, ही खूणगाठ सदैव बाळगली पाहिजे.

**काही** महिन्यांपूर्वी एक मजेशीर योग आला. एकाच दिवशी, लागोपाठ, बालगंधर्व व मास्तर कृष्णराव यांचे साथीदार हरीभाऊ देशपांडे यांचे पेटीवादन व निखिल बॅनर्जी यांचे सतारवादन असे कार्यक्रम ऐकावयास मिळाले. हरीभाऊंनी बालगंधर्व डोळ्यासमोर उभे केले तर निखिलबाबूंनी समोर रविशंकर व विलायत खां यांच्या प्रतिमा तरळत ठेवतानाच स्वतःचा असा ठसा उमटविण्याची खटपट केली.

आजचे वाटते. संगीतात 'कालचे–आजचे' प्रकार कसा उद्भवतो असा प्रश्न पडला व त्याचाच विचार आज प्रस्तुत आहे.

**संगीताचे कालमापन म्हणजे काय ?**

विशिष्ट संगीत हे आजचे वा कालचे आहे, असे आपण म्हणू शकतो, याचाच अर्थ असा की संगीत हे कालनिबद्ध आहे. विशिष्ट कालाशी नाते सांगणे, म्हणजे त्या कालाची अशी एखादी खूण, एखादा ठसा त्या संगीतावर असणे. संगीत कालविशिष्ट असते ते या अर्थाने.

# 'संगीतातील काल–विशिष्टता'

–रसिकप्रिया



तसे पाहता या घटनेत काही फारसे वेगळे आढळणारहि नाही कदाचित. पण या दोन्ही कार्यक्रमांच्या निमित्ताने काही सांगीतिक प्रश्नांनी मनात उचल खाल्ली. व त्या संदर्भात या योगायोगाची गंमत वाटली इतकेच.

झाले काय की हरिभाऊंचे वादन ऐकताना बालगंधर्व-युगात गेलो आहोत, असे वाटू लागले. हे युग चालू युग नसून मराठी संगीत-परंपरेतील एका वैभवशाली पण भूतकालात जमा झालेल्या कालखंडाची साक्ष पटविणारे आहे, ही जाणीव प्रामुख्याने होऊ लागली. उलटपक्षी निखिलबाबूंच्या कार्यक्रमात आजच्या पण काहीशा स्थिरपद झालेल्या वादनशैलींच्या मेलनाचा प्रयत्न दिसला. वेगळ्या शब्दांत सांगावयाचे तर हरिभाऊंनी सर्व तपशीलांसह संपन्न असे बालगंधर्व-संगीत-दर्शन घडविले व ते सांगीतिक दृष्ट्या कलापदवीस पोचले हे पटूनहि ते संगीत कालचे आहे, आजचे नव्हे, असे वाटले. व निखिलबाबूंचे वादन त्या दिवशी रंगलेले नव्हते, म्हणजे कलादृष्ट्या यशस्वी झाले नव्हते, तरीहि

पण वर हरिभाऊ आणि निखिलबाबूंच्या उदाहरणात दाखविल्याप्रमाणे कलापदवीस एखादा सांगीतिक प्रयत्न पोचणे, व दुसरा याबाबतीत अयशस्वी ठरणे यांचा संगीताच्या कालविशिष्टतेशी संबंध नाही. संगीत हे स्थलकालातीत असते, असे म्हणण्यांत एक गोष्ट गृहित धरली जाते. ती ही की संगीत कालचे ठरणे म्हणजे कलादृष्टचा त्याचे कनिष्ठत्व प्रस्थापित होणे. वास्तविक असे नसते. व्हीनसचा पुतळा कालचा व मूरची 'वूमन' ही कलाकृति ही आजची असे म्हणण्यात कलादृष्टचा श्रेष्ठ–कनिष्ठ मुळीच सूचित केले जात नाही. कालचे म्हटल्याने व्हीनसच्या 'कलाकृती'पणात काही घट होत नाही व आजची म्हटल्याने मूरच्या 'वूमन'मध्ये गुणवत्तेच्या दृष्टीने काही भरहि पडत नाही. "कालचे-आजचे" या कलामूल्यगर्भ संज्ञा नाहीत. पण या संज्ञानी दर्शविला जाणारा अनुभव हा सत्य आहे. व हे सत्य डावलून समीक्षा करणे ही फसवणूक आहे.

कालचे-आजचे या कलामूल्यगर्भ संज्ञा नाहीत याचाच अर्थ असा की हे कालचे-

अनुक्रमणिका

आजचे पण अशा काही बाबतीत असते की ज्यांचा एखादी क्रिया-कलाकृति होणे व न होणे याच्याशी काही संबंध नसावा. निखिलबाबूंचे वाजविणे आजचे वाटणे याचा संबंध, ते वादन कलापदवीस पोचण्याशी नसावा. व हरिभाऊनी सादर केलेले बालगंधर्व-संगीत कलापदवीस पोचूनहि आजचे वाटले नाही, कारण कलापद्धती गांठणे व कालचेपण यांचा प्राकृतिक विरोध नसावा.

आता दोन प्रश्न समोर उभे राहतात. एक म्हणजे कलादृष्टचा कमी महत्वाच्या व परिहार्य अशा ज्या गोष्टींमुळे संगीताच्या कालविशिष्टतेचा बोध होतो त्यांच्या स्वरूपाचा शोध घेणे व नंतर या गोष्टींचाच कालाशी घनिष्ठ असा संबंध कां येतो, याचा विचार करणे. शास्त्रीय संगीताच्या संदर्भात कालविशिष्टता जाणवते ती प्रथमतः राग व रागांचे चलन या बाबतीत. संगीत-क्षेत्रात रागांचे व प्रचलित-अप्रचलित ( वा अनवट ) असे रागांचे वर्गीकरण झालेले आहे. अर्थात हे वर्गीकरण स्थूल आहे. कारण काल अप्रचलित मानला जाणारा राग आज प्रचलित होतो. परंतु या अप्रचलिताचे प्रचलितात रुपांतर होण्यास एके काळी अप्रचलित वाटणारा राग वारंवार गायला जाणे, हेच कारणीभूत असते, हे लक्षात घेतले पाहिजे.

उदाहरणार्थ वीस-एक वर्षांपूर्वी मधुवंती वा हंसकिंकिणी हे राग अप्रचलित वाटत होते. वारंवार तेच गाण्याचा प्रकार घडून हे राग अप्रचलितात मोडेनासे झाले. आज या रागांना अप्रचलित म्हणणे एखाद्या सांगीतिक Rip Van Winkleलाच शक्य आहे. याचाच अर्थ असा की एखाद्या कालखंडात तत्कालीन सदर्भात अप्रचलित समजल्या जाणाऱ्या रागांचा अधिक प्रचार करण्याकडे प्रवृत्ति असते. तर कधी ती नसते. याचा संबंध अर्थातच एखादा संगीताचा कार्यक्रम कलादृष्टचा यशस्वी ठरतो की नाही याच्याशी प्रत्यक्ष व अपरिहार्य स्वरूपाचा नसतो. परंतु विशिष्ट कालखंडातील ती प्रवृत्ति तत्कालीन संगीताविष्काराची एक खूण बनते व या संदर्भात संबंधित कलाविष्कार कालविशिष्ट होतो.

## अप्रचलित रागांकडील वाढता ओढा

आज अप्रचलित राग गाण्याची प्रवृत्ति वाढीस लागलेली आहे. दाक्षिणात्य संगीत-पद्धतींतील रागांची मोठ्या प्रमाणावर आयात व त्यांचे हेतुपुरःसर संगोपान केले जात आहे, हे आजच्या कालाचे वैशिष्ट्य मानावयास पाहिजे. गेल्या पिढीतील एकंदर संगीताविष्कार व आजच्या पिढीतील संगीताविष्कार यांत आजच्या पिढीचा अप्रचलित रागांकडे असलेला ओढा तिला कालच्या पिढीहून वेगळे काढतो.

कोणते राग गावयाचे याबरोबरच ते कसे गावयाचे याहीबाबतीत संगीतातील कालविशिष्टता जाणवते. गायकाच्या प्रवृत्तीनुसार व त्याच्या घराण्याच्या कायद्यानुसार रागाचे चलन बदलते, ही गोष्ट खरीच. पण तरीही सापेक्षतः विस्तृत कालखंडाच्या निरीक्षणानंतर सर्वसाधारण ठरणारी अशी एक प्रवृत्ति एकंदर संगीताविष्कारात आढळून येते. रागाच्या चलनाबाबत बोलावयाचे तर आज सर्वच रागांचे चलन विलंबित आलापचारीने भारावले आहे असे दिसेल. अगदी मध्यलयीनेच ज्यांची सुरवात, अशा ग्वाल्हेर घराण्याबाबतहि आज हे विधान करावयास हरकत नाही. चलन आलापचारीकडे झुकले आहे ही गोष्ट एकाच घराण्याच्या दोन गायकांनी (एक कालचा व एक आजचा) गायलेला एकच राग ऐकला असता सहज लक्षात येते. उदाहरणार्थ ग्वाल्हेर घराण्याचे एक आद्य पुरुष पं. रहिमतखां व अगदी परवाचे ग्वाल्हेर-गायक कै. बापूराव पलुस्कर या दोघांच्याहि मालकंसच्या ध्वनिमुद्रिका ऐकल्यास पं. रहिमतखांची काहीशी सदा चपलगति गायकी व कै. बापूरावांचा द्रुत चीजेत सुद्धा आलापाकडे असलेला ओढा सहज लक्षात येतो. रागांच्या चलनाबाबत संगीतातील कालविशिष्टता दिसते ती अशी.

आलापचारीकडे एकंदर रागचलनाची ही जी एक प्रवृत्ति आहे त्यामुळेच दुसरीहि एक गोष्ट घडते. ती म्हणजे एकूण लय विलंबित ठेवणे. आलापांकडे ओढा वळल्यामुळे लय विलंबित ठेवावी लागते व आलापचारीकडे असलेल्या सार्वत्रिक प्रवृत्तीमुळे एकंदर सर्वच संगीताविष्कार संथ लयीचा उपयोग करण्याकडे झुकलेला दिसतो.

## शब्दार्थ आणि संगीत यांचे नाते

कालविशिष्ट म्हणण्यासारखी आणखी एक खूण म्हणजे शब्दार्थाना आजच्या संगीतात प्राप्त झालेले स्थान व एकंदर संगीत क्षेत्रात सुगम संगीताचे वाढलेले महत्व.

आज शब्दार्थांना संगीतात स्थान मिळते याचा अर्थ असा नव्हे की, चीजात काव्य आहे की नाही ते गायक व श्रोते प्रथम पाहतात. अर्थ इतकाच की आहेत त्या चीजा सादर करताना त्यात सूचित असलेल्या सांचेबाज, ठोकळेबाज भावनाविष्काराच्या आधारे संगीताविष्काराचा प्रयत्न होतो. काव्यात अर्थ हा वाचकाना एका रीतीने फसविण्यासाठी असतो. खरे काव्य हे या अर्थापलीकडे असते. पण या अर्थाच्या आमीषाने ते काव्य वाचकाच्या गळी उतरविले जाते, अशी एक भूमिका आज मांडली जाते. काव्यातल्या अर्थाने अशी एक संवेदनाशील मनोवस्था तयार होते की, त्यामुळे काव्याचा आशय समजण्याची शक्यता निर्माण होते, असे या भूमिकेचे पुढले स्पष्टीकरण असते. आजची शब्दार्थांवर अधिक लक्ष देण्याची प्रवृत्ति म्हणजे एकाद्वारे दुसरे कार्य सुलभ करण्याच्या याच प्रयत्नाचा आविष्कार होय.










आणि एका दृष्टिकोनातूनहि या शब्दार्थप्रधानतेचा उलगडा होतो. तसे पाहिले तर "विस्तार व संकोचाद्वारे तीव्रीकरण" या दोन अवस्थांमध्ये संगीताची वाटचाल नेहमीच कमी-अधिक झुकून चाललेली आहे. नाद, स्वर, सप्तक येथपर्यंत अधिकाधिक सांगीतिक घटक मिळविण्यात विस्ताराकडे संगीतशोध झुकला होता. राग म्हणजे सप्तकाचे संगोपन संकोचाने करून तीव्रीकरणाकडे झुकण्याचा प्रकार होता. पुढे रागांच्या संख्येत भर टाकीत जाण्याचा 'विस्तार' अवस्थेचा आढळ व पुन्हा आता त्याच रागात पण शब्दार्थाद्वारे तीव्रीकरण साधण्याचा प्रयत्न, म्हणजेच संकोचाद्वारे तीव्रीकरण ही अवस्था—असा हा आलेख आहे. रागांचा विस्तार करताना मार्ग खुंटला अशी जाणीव झाल्याने, संगीत-शोधात असलेल्या मानवी प्रज्ञेने शब्दार्थाचे आणि एक परिमाण संगीताविष्कारास देण्याचा प्रयत्न करणे ही या 'विस्तार-संकोच' यांच्या दरम्यान वाटचाल करणाऱ्या संगीताची एक अवस्था आहे.




अवस्था या अर्थातच कालनिबद्ध असतात. आज असलेल्या अवस्था उद्या टिकत नाहीत. आजची शब्दार्थप्रधानता ही या संदर्भात एक कालविशिष्ट अवस्था आहे. याचाच एक परिणाम म्हणून ख्यालियेसुद्धा रागविस्तार ठुंबरी शैलीच्या अंगाने करीत असताना दिसतात. व सुगम संगीताची वाढती लोकप्रियता हीहि याच शब्दार्थाद्वारे तीव्रीकरण साधण्याच्या प्रवृत्तीचा एक आविष्कार होय.

## शब्दार्थ आणि वाद्यसंगीत

आतापर्यंत चाललेली चर्चा ही गायनाच्या संदर्भात अधिक झालेली आहे. पण तरीहि त्यात उपलब्ध झालेले निष्कर्ष वाद्यसंगीताबाबतसुद्धा लागू पडतात असे आढळून येईल. राग व रागांचे चलन या बाबतीत काहीच अडचण भासणार नाही. शब्दार्थाद्वारे तीव्रीकरण हा प्रकार वाद्यसंगीताबाबत अशक्य वाटतो. पण याहि बाबतीत एक गोष्ट लक्षात घेण्यासारखी आहे. ती म्हणजे गेल्या काही वर्षांत आपापल्या वाद्यांना स्वतंत्र कार्यक्रमाची वाद्ये म्हणून प्रतिष्ठा प्राप्त करून देणाऱ्या पं. रविशंकर विलायतखां वा बिसमिल्ला खां, वा पं. गजाननराव जोशी इ. सर्वच वादकांनी आपल्या वादनात-गायनात शक्य ते सारे करण्याचा प्रयत्न चंग बांधून केलेला आहे. म्हणजे प्रत्यक्ष शब्दार्थाद्वारे तीव्रीकरण साधणे हे शब्दोच्चार वाद्यात अशक्य असल्याने या वादकांना जमले नसले तरी, शब्दार्थाद्वारे तीव्रीकरण साधताना स्वर-लयादि निखळ नादाधिष्ठित घटकांच्या मेलनाचे जे जे प्रयोग गायक करतात, तेच या वादकांनी केलेले आहेत. खटके, मुरके, मींड इ. ची प्रचुरता ही याच प्रयत्नांची गमके होत. अशा तऱ्हेन वादकांबाबतहि तीव्रीकरण सुगम संगीताच्या अंगाने ही अवस्था दिसतेच. संगीतातील कालविशिष्टतेच्या विचारात आतापर्यंत शास्त्रीय व सुगम शास्त्रीय संगीताच्या संदर्भातच विचार केला. पण याला कारण इतकेच की अनेक वर्षांची परंपरा व परंपरेतील स्थिरपद झालेल्या संकेतांची विपुलता यामुळे कालसंबद्धतेमुळे संगीतात जाणविणारा बदल हा निश्चित व सहज दर्शविता येतो. व दुसरे कारण असे की कलापदवीस पोचलेल्या साऱ्याच संगीताविष्कारात एका अर्थाने शास्त्रीयत्व येत असते. इथे शास्त्रीयत्व याचा अर्थ इतकाच की त्यात एक नियमबद्धता, संयमपूर्ण संक्रमणशीलता व सातत्य असते. तेव्हा शास्त्रीय संगीताबाबत कालविशिष्टतेचा आढळ ज्यामुळे होतो अशा राग, चलन, लय, शब्दार्थप्रधानत्व याच गोष्टींचा (इतरांसहित) आढळ कोणत्याही संगीताविष्कारात होईल.

आता प्रश्न राहिला तो म्हणजे याच गोष्टी कालनिबद्ध, कालविशिष्ट कां याचा विचार करणे.

## सांस्कृतिक घडामोडींचा परिणाम

तसे पाहिले तर याचे एक उत्तर तात्विक दृष्ट्या आधीच येऊन गेलेले आहे. संगीताच्या प्राणतत्त्वात वरील गोष्टींचा समावेश होत नसल्याने त्यांची हालचाल वा बदल, संगीतकृती कलाकृति होणे वा न होणे याच्याशी काहीही संबंध न ठेवता, होऊ शकते. एका अर्थाने याच बाबींची कालविशिष्टता असणे हा सांगीतिक नसून सांस्कृतिक प्रश्न ठरू शकेल.

समाजाच्या विशिष्ट अवस्थेत संगीताची विस्तारअवस्था समाजास कलादृष्टया असमाधानकारक वाटावी वा शब्दार्थासारख्या बाह्य व अप्रत्यक्षत: संबंधित गोष्टींद्वारा संगीतसिद्धी साधण्याची गरज भासावी याचे रहस्य एकंदर सांस्कृतिक प्रवाहाचे स्वरूप व त्याने घेतलेली वळणे यातच शोधावे लागेल. हा प्रयत्न विस्ताराने व आवाक्याने आजच्या विषयाबाहेरचा आहे. तेव्हा या प्रश्नाच्या उल्लेखावरच भागविले पाहिजे.

परंतु 'काल-आज' यावर श्रेष्ठ-कनिष्ठत्व ठरविण्याच्या सर्वसामान्य सांस्कृतिक संदर्भात संगीतातील श्रेष्ठकनिष्ठत्व त्याच्या कालचे-आजचेपणावर अवलंबून नाही, हा विचार लक्षात ठेवणे मात्र जरूर आहे. नवकविता नव-नाट्य यांच्या चालीवर नवसंगीत शोधण्याच्या भरात आजच्या रूढीप्रमाणे नवीन राग, संथ लय व शब्दार्थाद्वारे संगीतात अवतरणारी भावनाशीलता (कीं भावुकता?) यांनाच श्रेष्ठ संगीत समजताना मूल्यांची जागा तोडग्यांना दिली जाण्याचा महा-घोटाळा होत असल्याची जाणीव करून देणे जरूर वाटते. कालची कला व आजची कारागिरी यात कालची कला श्रेष्ठ आहे. आजची कारागिरी जवळची आहे पण हे कालायत्त देणे. याची मातब्बरी मर्यादित हे लक्षात न ठेवल्यास कला क्षेत्राचे वातावरण दूषित होईल. व अशा वातावरणात अस्सल कलाविष्कारहि गुदमरावयाचा. असे घडू न देण्याची जबाबदारी गाणाऱ्यांची, ऐकणाऱ्यांची त्याचप्रमाणे गाण्याविषयी लिहिणाऱ्यांचीहि. म्हणूनच हा सारा प्रपंच!

●●●










–राजाराम हुमणे

# झणकरवाडीचा संगीतोत्सव

**रंगमंच दक्षिणोत्तर होता. तर बाई बसल्या पूर्वेकडे तोंड करून. लोकात चुळबूळ सुरू झाली. व्यवस्थापकानी भीत भीत सुचविलं की, बैठकीचा मोहरा चुकला आहे. तशी बाई कडाडल्या..... मला नका अक्कल शिकवू. मी 'प्रोफाइल'मध्येच अधिक चांगली दिसते म्हणून अशीच बसणार मी ?**



**मुंबईतील** आळीआळीतून आणि चाळीचाळीतून कळप करून रहाणारी माणसं एरवी एकमेकांचा गळा दाबायला उठतील. परंतु 'तसा' प्रसंग आला तर एकमेकांच्या गळ्यात गळा घालून आणि गळा काढून रडतील. 'तसा' प्रसंग म्हणजे चाळीतील एखादा रहिवासी कैलासवासी होणे. अशा प्रसंगी सारी चाळ त्याला खांदा द्यायला पुढे सरसावते. परंतु चाळ खांदा देण्याच्याच प्रसगी खांद्याला खांदा लावून काम करते असे नव्हे. मृत्यु जसा चाळीतील समष्टीला जन्म देतो, त्याप्रमाणे जन्मसुद्धा. परंतु हा जन्म म्हणजे माणसानी गजबजलेल्या सिंगल खोलीत आणखी बजबजपुरी माजविण्यासाठी आलेल्या अर्भकाचा मात्र नव्हे. चाळीला जन्म हवा कृष्णाचा, नाहीतर गणेशाचा. चाळीतील उत्साहाला उधाण येते ते गणेशचतुर्थीला, नाहीतर जन्माष्टमीला. या उत्सवप्रियतेला आमची झणकरवाडीहि अपवाद नव्हती.

मुंबईची शोभा वाढविणारा सहस्त्रावधि चाळीसारखी झणकरवाडी हीहि एक चाळ होती. ही चाळ उभी रहाण्यापूर्वी इथे 'झणकर' नांवाच्या गृहस्थाचे बैठे घर दबा धरून बसले होते. आवतीभोवती चार झावळ्याच्या झोपड्या होत्या आणि नारळीची चार झाडे होती. मुंबईत 'सुधारणा' आल्यावर या झोपड्या आणि झाडे उडाली आणि त्याच्या जागी एक टोलेजंग इमारत उभी राहिली. या इमारतीमुळे वस्तीचे रूप पालटले पण नांव मात्र कायम राहिले.

झणकरवाडीतील ही नवी इमारत टोलेजंग म्हणायची एवढ्याचसाठी की तिला अनेक मजले होते. आकाशाला गवसणी घालण्याइतकी उंची होती. परंतु या इमारतीत रहाणारी माणसं मात्र 'भुईसपाट' झालेली खुजी माणसं होती. सिंगल खोलीत संसार थाटणारी, दुसऱ्या सिंगल खोलीत रहाणाऱ्या शेजाऱ्याचे वर्म टिपण्यासाठी टपलेली, नळावर पहिला नंबर पटकावला की 'जितं मया' म्हणून ताठ्यानं मिरविणारी, नंबर खाली गेला की चरफडणारी, वरच्या नंबरवाल्याच्या अंगावर खेकसणारी, भांड्यांची आदळआपट करणारी, भांडणतंटा उकरून काढणारी. एकमेकांच्या घरासमोर कचरा टाकणे हा येथील नागरिकांचा सर्वात मोठा पराक्रम. येथील पौरजन म्हणजे आपली खोली कचऱ्याची पेटी असली तरी सुईच्या अग्राएवढा जरी दुसऱ्याचा कचरा तीत पडला की महाभारत निर्माण करणारे कौरवजन. रौरवात रहाणारे परंतु स्वर्गाला हात पोहोचलेले. चाळीचा व्हरांडा ते त्यांचं कुरुक्षेत्र. परंतु त्या कुरुक्षेत्रात पुरुषांपेक्षा बायकांच्या लढाया अधिक. आणि एकमेकींच्या झिंज्या धरणे हा त्यांचा आवडता युद्धप्रकार. युद्धशास्त्राप्रमाणे सूर्यास्ताला या लढाया बंद होत. परंतु सूर्यास्तानंतर बायकांच्या भांडणातून उद्भवलेली युद्धे खेळण्यासाठी पुरुष पुढे सरसावत. 'रात्रंदिन आम्हां युद्धाचा प्रसंग' असं चाळीतील प्रत्येकाने अभिमानाने सांगावे असं विक्रमशाली वातावरण येथे सदैव असायचं. समझोता व्हायचा तो गणेशोत्सवात. तहनामा व्हायचा तो जन्माष्टमीला. धुसफुसणारी, धुमसणारी चाळ यावेळेला पायात चाळ

बांधून नाचायची, गळयात टाळ घालून गायची !

झणकरवाडीतील प्रत्येक कुटुंब हे ह्या वाडीतील दुसऱ्या कुटुंबाचे हाडवैरी असले तरी दुसऱ्या चाळीशी सामना द्यायचा प्रसंग आला म्हणजे सबंध चाळ 'एक माणूस' बनून उभी राह्यची. मग चाळीचाळीत सामने सुरू व्हायचे. गणेशोत्सव हा त्यातील अटीतटीचा सामना. ज्या चाळीची मूर्ति मोठी तिची कीर्ति मोठी. जिचे कार्यक्रम मोठे तिचा दबदबा मोठा. झणकरवाडीचा गणेशोत्सव खूप गाजायचा. दुसऱ्या चाळींना मान खाली घालायला लावायचा. दुसऱ्या चाळींवर यातूनहि अधिक ताण करण्यासाठी उंच मानेची झणकरवाडी मग दुसरे मार्ग शोधू लागली. आणि त्यातूनच झणकरवाडीच्या म्युझिक सर्कलचा जन्म झाला. 'झणकरवाडी म्युझिक सर्कल' हे त्याचे बालबोध नांव. परंतु झणकरवाडीच्या इंग्लिश स्पेलिंगमधून 'झंकार' हे कलात्मक नांव निघाले.




इतर चाळींप्रमाणे झणकरवाडीतहि बाहेर कठड्याजवळ ओली वाळींतीं सुन्मन असत आणि आत मोरीच्या कठड्या-जवळ, कुबट आणि कोंदट वातावरणात, शुष्क माणसं आणखी वाळून जात. त्यांचा शुष्क जीवनावर 'झंकार' सुरांचे तुषार उठवू लागले. महिन्या महिन्याला चाळीत झंकार अमुक सादर करीत आहे, झंकार तमुक सादर करीत आहे अशा पाट्या झळकू लागल्या. राधेकृष्ण बोल मुखसे गाणाऱ्या रंगेल शास्त्रीय गायकापासून राधेचा अंबाडा सैल करणाऱ्या रंगेल भाव-गीत गायकांच्या मैफली झणकरवाडीत झडू लागल्या.

भास्कर बेहरे हा एक म्युनिसिपल शाळेमधील तरुण गायनमास्तर. सबंध झणकरवाडीत तंबोऱ्याच्या तारा जुळवू शकणारा, तबल्यावर हातोडा मारू शकणारा आणि पेटीवर हात फिरवू शकणारा हा एकमेव माणूस. त्यामुळे 'झंकार' चाल-विण्यात त्याचा मोठा हात होता. 'झंकार'च्या चिटणीस पदावर यापेक्षा अधिक लायकी आणि लायक माणूस मिळणे कठीण होते. बखल्यांशी याचा नांवापुरता का होईना पण संबंध असल्यामुळे वाडीत तरी तो गाण्यातील भास्कराचार्य होता. गाण्यातील कच्चा बच्चा अजूनहि बेहरेबुवासारखा ख्यातनाम झाला होता. बेहरेबुवा म्हणून त्याला कुणी गंमतीने हाक मारली की हा भास्कर तळपू लागायचा.

भास्करचा गळा विशेष चालत नसला तरी डोके फार चालायचे. 'झंकार'च्या पहिल्या वर्धापनदिनाच्या समारंभात झंकारने एक संगीतोत्सव साजरा करावा असे पिल्लू त्याने सोडले. आणि उत्सवप्रिय झणकरवाडीने ते लगेच उचलून धरले. लागलीच सबंध झणकरवाडी संगीतो-त्सवाच्या तयारीला लागली. उत्सव समि-तीच्या पहिल्या बैठकीत 'भास्कर' बेहरेने संगीतोत्सवाचा आराखडा मांडला. जागच्या जागी अर्थसमिति, मंडप समिति, स्वागत समिति, व्यवस्था समिति, कार्यक्रम समिति वगैरे समित्या नेमल्या गेल्या. खाणावळीत स्वयंपाक्याचे काम करणाऱ्या काणेबुवानी, भोजन समिति नेमायची राहून गेली, अशी तक्रार केली. परंतु निर्माण झालेला हा पेचप्रसंग सोडविण्याची भास्करने एक शक्कल काढली. संगीतोत्सव ही गाण्याची मेजवानी असल्यामुळे कार्यक्रम समितीलाच मेजवानी-समिति असे नाव द्यावे, असे त्याने सुचविले. आणि भोजनप्रिय सभासदांचे तोंड बंद केले.

मेजवानी समितीच्या म्हणजेच कार्यक्रम समितीच्या पहिल्या बैठकीतच संगीतो-त्सवाचा होलिकोत्सव होणार अशी लक्षणे दिसू लागली. सबंध वाडीत रेडिओ अस-लेली चारपांचच समृद्ध बिऱ्हाडे होती. आपण चोवीस तास रेडिओ लावतो आणि साऱ्या वाडीला, तिची इच्छा असो वा नसो, ऐकवतो म्हणून गाण्यातील आपल्याला फार कळते असा त्यांचा दावा. 'लंका' लावून भार-ताला 'कलंक' लावणाऱ्या या रेडिओ-वाल्यानी यच्चयावत् साऱ्या पार्श्वगायकांना आणि पार्श्वगायिकांना बोलावले पाहिजे असा आग्रह धरला. हनुमान थिएटरमध्ये तमाशा चोरून पहाणाऱ्या दौलतरावानी तमाशातील लावणी-गायिकांची फर्माइश केली. तर वाडीत असलेल्या एकुलत्या एक दाढीवाल्यानी कव्वाली-क्वीन शक्कीला बानूची बावडी सोडली. खालच्या माळ्या-वर राहूनहि वर डोळे लागलेल्या माळकरी आणि टाळकरी बुवानी फुलाजीबुवांच्या नांवाचा जप सुरू केला. पंडित रविशंकर, अलीअकबर खाँ, बिस्मिल्ला ही नांवं काहींच्या कानावरून उडत उडत गेली होती. पंडित रविशंकरचं गाणं झालंच पाहिजे, "बिस्मिल्ला खांचा तबला ठेवाच बुवा,' 'अली अकबर खाँची शहनाई ऐकण्यासारखी असते हो.' असं म्हणत का होईना त्यांची नांवं पुढे आली म्हणून बेहरेला हायसे वाटले. पांचव्या माळ्यावर रहाण्याऱ्या खट-खट्यांची मेहुणी मीरा नुकतीच संगीत विशारद झाली होती. ती आपल्या गाण्याने लोकाना गारद करून टाकायची. झणकरवाडीच्या संगीतोत्सवात उदयोन्मुख कलाकारांना उत्तेजन मिळाले पाहिजे








अशी मौलिक सूचना करून खटखटचानी हिरावाईनंतर मीरावाईलाहि पुढे सरकावले.

या सर्व सूचना ऐकल्यावर दर्दी भास्कर सर्द झाला त्याचे डोकेच गरगरायला लागले. कार्यक्रम समितीच्या पहिल्याच बैठकीत शास्त्रीय संगीताचे इतके धिडवडे निघतील याची त्याला कल्पना नव्हती. परंतु गायनात जरी तो पक्क्या गुरुचा चेला नसला तरी आयोजनात तो काही कच्च्या गुरुचा चेला नव्हता. सुन्न मनाने पण प्रसन्न मुखाने त्याने या सर्व सूचना मान्य केल्या. आपल्या म्हणूनहि काही सूचना मांडल्या. त्या सर्व सूचनांची नामावली करून समितीकडून ती संमत करून घेतली. त्या सर्वांना संगीतोत्सवाची आमंत्रणे जातील असे तोंडभर आश्वासनहि त्याने दिले. बिदागीत बसतील तेवढेच कलाकार बोलविले जावेत आणि यादीतील कलाकार न मिळाल्यास इतर कलाकार ठरविण्याचा अधिकार बेहरेला असावा असा ठरावहि त्याने संमत करून घेतला. हा ठराव म्हणजे मूर्खपणाच्या सर्व सूचना निकालात काढण्याचा डाव आहे हे मात्र कुणा शहाण्याच्या लक्षात आले नाही.

संगीतोत्सवाच्या तयारीला धूमधडाक्याने सुरुवात झाली. सुचविलेल्या सर्व कलाकारांना आमंत्रणे धाडली गेली. भास्करच्या अपेक्षेप्रमाणे बऱ्याच जणांनी उत्तरेच धाडली नाहीत. काही मान्यवर गायकवादकानी दोनतीन हजार रुपये बिदागी आणि शिवाय कलकत्ता ते मुंबई असा जाण्यायेण्याचा किमान खर्च मागितला. झणकरवाडीला हे कलाकार अर्थातच पेलणारे नव्हते. खिशात करन्सी नोट्स् पडल्याशिवाय ज्यांच्या घशातून म्युझिकल नोट्स् बाहेर पडत नाहीत अशा महाभागाना महाग कलाकार म्हणून 'बाहेर' काढावे लागले. गाणं म्हणजे आतबट्ट्याचाच धंदा समजणारे तेवढे 'आत' आले. आतला वशिला असलेली तट्टं आपोआपच आत घुसली.

'झंकार' आयोजित नि भास्कर नियोजित संगीतोत्सव आज सुरू होणार होता. झणकरवाडीतील कुठलाहि कार्यक्रम रात्री नवाच्या आधी कधी सुरू व्हायचा नाही. कारण तत्पूर्वी ताटपाट करून वायका रिकाम्या होत नसत आणि वायकानी सुटका केल्याशिवाय पुरुष रिकामे होत नसत. म्हणूनच भास्कर बेहरेने कार्यक्रमाची सुरुवात मुद्दाम आठला ठेवली. आठ ते नऊ या वेळात त्याने वशिल्याची सर्व तट्टं दावणीला बांधली. त्यांचं खिकाळणं किंकाळण्याऱ्या पोरांशिवाय कुणी ऐकायला नको हा त्यामागे मुख्य उद्देश होता. या तट्टांचा पहिल्या घंटेसारखा उपयोग करावा, हाहि एक दुय्यम उद्देश होता. ती तट्टं रंगमंचावर आपले गुण उधळू लागली की 'बापरे कार्यक्रम सुरू झाला वाटतं' असं म्हणत ताटावर बसलेली माणसं पटापट उठावीत असा त्याचा कट होता.

पहिल्याच दिवशी दिल्लीच्या एका खांसाहेवांचं गाणं होतं. श्री. वेखंडे, श्री. लोखंडे, श्री. श्रीखंडे आणि श्री. दोरखंडे हे स्वागत समितीचे चार सभासद निर-











निराळ्या गायकाना आणण्यासाठी चार दिशाना केव्हाच रवाना झोले होते. खांसाहेबांचा कार्यक्रम नवाला म्हणून सात वाजताच श्री. वेखंडे ह्यांच्या घरी जाणार होते. परंतु नऊ वाजायला आले तरी वेखंड्यांचा निरोप नव्हता की खांसाहेबांचा पत्ता नव्हता. शेवटी एकदाचे नऊ वाजता खांसाहेब मोठ्या इतमामात दाखल झाले. मोठ्या इतमामात म्हणायचे कारण म्हणजे पायघोळ पायजमा आणि काळी शेरवानी असा पेहराव केलेल्या या उमरावाबरोबर वीस-पंचवीस माणसांचा लवाजमा होता. या सर्वांची अॅरेंजमेंट करा अशी पहिली ऑर्डर खांसाहेबानी सोडली. भास्कर बेहरेने खांसाहेबांचा गोतावळा न्याहाळला आणि त्याला एकदम धक्काच बसला. त्यातली निम्मी मंडळी कालच त्याच्याकडे येऊन 'पास' मागून गेली होती आणि बेहरेने त्याना धुडकावून लावले होते. तीच मंडळी आज खांसाहेबांची लुंगी धरून मोठ्या मानाने आली होती आणि 'आम्हीहि काही लुंगी सुंगी माणसं नव्हत' अशा आविर्भावात भास्करला हिणवीत होती. काल भीक न घालता हाकलून दिलेल्या भिकाऱ्यांचे 'सन्माननीय पाहुणे' म्हणून स्वागत करण्याचा बाका प्रसंग बेहरेवर आला होता. बेहरेचा संताप अनावर झाला. परंतु त्याने आपल्या मनाला आवर घातला. पाहुण्याना पुढे बसवले आणि खांसाहेबाना मागे नेले.

खांसाहेब गायला बसल्यावर बेहरेने वेखंडेंना बाजूला नेले आणि उशीर होण्याचे कारण विचारले. वेखंडेनी सांगितलेला किस्सा ऐकून बेहरेला खांसाहेबांचा धसकाच बसला. वेखंडे गेले तेव्हा खांसाहेब झोपलेले होते. वेखंडेनी त्यांना उठविले. सूर्यास्त हा खांसाहेबांच्या दैनंदिनीत सूर्योदय असावा. उठल्याबरोबर खांसाहेबानी चहा मारला, पान लावले आणि 'नहान' करण्यासाठी ते जे हमामखान्यात गेले ते तासभर बाहेर आलेच नाहीत. आत खांसाहेब अंग चोळीत बसले होते. बाहेर वेखंडे हात चोळीत बसले होते. तोपर्यंत खांसाहेबांचा गोतावळाहि जमा झाला. खांसाहेब बाहेर आले ते "अपनी कितनी गाडियाँ है ?" अशी

**संगीत राजकीय जल्लोष !**



**अतुल हा घोष। आम्हां कोण पाडी।।**
**डोळ्यांची झांपडी। हाती आली।।**

पृच्छा करीतच. 'एक' असे वेखंडेनी उत्तर दिले. खांसाहेब एक चकार शब्दहि बोलले नाहीत "आप आते है ना? देरी हो रही है." वेखंडे चाचरत म्हणाले. "देरी कौन कर रहे ? मैं या आप ? मेरे साथ बीस लोग है. एक गाडीमे इतने लोग कैसे आयेंगे ?" खांसाहेबानी दरडावून विचारले. "अच्छा इंतजाम करता हूँ" म्हणून वेखंडेनी पांच सहा टॅक्स्या केल्या आणि सारी वरात मांडवापर्यंत आणून सोडली.

खांसाहेबांचे गाणे संपायला आले तरी त्यानंतर बसणारी 'स्वरचंद्रिका' उगवली नव्हती. बेहरेंचा जीव वरखाली होत असतानाच बाई आल्याची वर्दी आली. तिच्या स्वागतासाठी बेहरे धोण टाकीत धांवत गेले. खांसाहेबांची लुंगी धरून जसे बरेच पाहुणे आले होते त्याप्रमाणे स्वरचंद्रिकेचा पदर धरून बऱ्याच चटकचांदण्याहि आल्या होत्या. त्यांच्या येण्याने समारंभाला शोभा आली खरी. परंतु येण्यापूर्वी त्यानी लोखंडेची बरीच शोभा केली. बाई गाडीत बसण्यापूर्वी एका चटकचांदणीने बाईंच्या लिपस्टिकचा रंग साडीला मॅच होत नाही असं बाईंच्या लक्षात आणून दिलं. बाईंच्या घरात त्या रंगाची लिपस्टिक नव्हती. लिपस्टिक बदलणं किंवा साडी बदलणं यातील एक गोष्ट करणं बाईंना आवश्यक होतं. तासदोन तास मोडून नेसलेली साडी सोडण्यास बाई तयार नव्हत्या. बाईंना हवी ती लिपस्टिक लोखंडेनी तत्परतेने आणून दिली कारण गाणं रंगणं किंवा न रंगणं लिपस्टिकच्या रंगावर अवलंबून असावे अशी त्याची समजूत झाली. लिपस्टिक पैदा केली तेव्हाच चांदण्याचा थवा हलला. लोखंडेना दोनचार टॅक्स्या तर भराव्याच लागल्या पण बाईंच्या लिपस्टिकचा भूदंडहि भरावा लागला.

गाणे संपवून खांसाहेब उठले. त्यांच्याबरोबर त्यांना चीकटून आलेल्या गांधिलमाशाहि उठल्या. रंगमंचामागे हातमिळवणी झाली. गळ्यात गळा घालून कडकडून मिठ्या मारल्या गेल्या. खांसाहेब गायले म्हणजे अस्मानातील चांद खुडून जणू त्यानी जमिनीवर लावला असा आभास त्यांच्या भोवती गर्दी केलेल्या शागिर्दांनी निर्माण केला. या पराक्रमानंतर शीण जाण्यासाठी त्याना पान खिलावण्यात आले. 'अहो ध्वनि'चा सोहळा संपल्याबरोबर खांसाहेब म्हणाले, "हमे जाना है. जानेका क्या इंतजाम है ?" "गाडी तैयार है," भास्करने शांतपणे उत्तर दिले. "सबके लिये ?" "नहीं, खाली आपके लिये" "लेकिन हमारे मेहमानोंकोहि पहुँचाना होगा." यानंतर कुणी आपल्याला अंधेरीला जायचे, तर कुणी आपल्याला मुलुंडला जायचे तर कुणी भांडूपला जायचे असे सांग लागले. खांसाहेबांच्या सर्व पाहुण्यारावळ्याना त्यांच्या घरोघर पोहोचवायचे म्हणजे दहा-बारा टॅक्स्या कराव्या लागणार होते. बेहरेने सर्व बळ एकवटून, धैर्य मुठीत घट्ट धरून सांगितले, "खाली एकहि गाडी है– और वह खाली आपकोहि मकानतक लेके जायेंगी. दुसरे लोगको पहुँचानकी जिम्मेदारी हमारी नही." एरवी गाण्यासाठी आवाज ताणायला अर्धापाऊण तास घेणाऱ्या खांसाहेबांचा आवाज क्षणार्धात तापला. तो अनेक अस्सल आणि इरसाल शिव्या देऊ



# तमन्नाओं की नगरी में....

'राहबर : उमरखय्याम्'

**मैं मैकदे की राहसे होकर गुजर गया,**
**वर्ना सफ़र ह्यात का काफ़ी तवील था !**

**—अदम देहलवी**

मद्यशाळेच्या मार्गाने मी निघून गेलो म्हणून बरे झाले. नाहीतर एरवी जीवनाचा प्रवास बराच लांबचा होता.

★ ★

**आंखो में आ के कौन इलाही चला गया ?**
**किस की तलाश में गिरे अश्के-खाँके चले?**

**— जलील**

हे ईश्वरा कोण वरे माझ्या डोळ्यांत येऊन निघन गेले? माझी वाहणारी आंसवे कुणाच्या शोधार्थ निघाली आहेत ?

★ ★

**मुअत्तर साँस, चेहरा रश्के-गुल, मस्तीभरी आंखें...**
**जवानी है इस सैलाबे-रंगोबू की धारा है ?**

**—अज्ञात**

अत्तराने भरलेले हे श्वास ! फुलास हेवा वाटावा असा हा चेहरा ! मदाने भरलेले हे डोळे ! गडे, हे तुमचे तारुण्यच आहे की रंग आणि गंधाच्या पुराचा प्रवाह ?

★ ★

**शम्मा में मस्ती कहाँ, जो एक परवाने में है ?**
**लुत्फ़ जलने में नहीं, जलजल के मर जाने में है?**

**—मजाज लखनवी**

पतंगात जी धुंदी असते ती ज्योतिपाशी कुठून येणार? तशीतर ज्योतीहि जळत असते पण... मजा जळण्यात नव्हे, तर जळत जळत मरण्यात आहे.

लागला. ओंकारातून निघणाऱ्या नादब्रह्मात लोकाना विलीन करणारा हा स्वरसम्राट 'माथेफिरू बादशा'प्रमाणे ओकारी आणि शिसारी यावी अशा गलिच्छ शिव्या देऊ शकतो हे पाहून वेहरेची कलावंतांवरची सारी श्रद्धाच ढासळून पडली. खांसाहेबांच्या गणंगानाच काय पण खुद्द खांसाहेबांनाहि आपण घरी पोहोचविण्यास बांधलेले नाहीत असे त्याने बजावले. आणि मग खांसाहेब त्यांच्यासाठी खास तयार केलेल्या लाखमोलाच्या 'वेस्ट' बसमधून स्वगृही परतले.

खांसाहेबांच्या गडबडीत बाईंचे गाणे केव्हा संपले हे समजले नाही. त्यानंतरच्या गवयाला घेऊन श्री. दोरखंडे केव्हाच आले होते. दोरखंडांनी या गवयाला जवळ जवळ बांधूनच आणले होते. गायक उपस्थित होते. परंतु गायच्या परिस्थितीत नव्हते. श्रोत्यांना गाण्याची नशा आणण्यापूर्वी त्यानी स्वतःच नशा केली होती. आपली काय दशा झाली आहे हे समजण्याइतकीहि त्याना शुद्धि नव्हती. टॅक्सीतून येताना बाहेर टाकलेली पानाची पिचकारी दारुप्रमाणेच त्यांच्या अंगावर आली होती. आणि त्यांचा मलमलचा सदरा लालीलाल झाला होता. खांसाहेवाना मार्गाला लावल्यावर या बुवाना सरळ मार्गावर आणण्यासाठी वेहरेला जिवाचं पाणी करावं लागलं. म्हणजे प्रथम बुवाना सार्वजनिक नळाखाली नेऊन त्यांच्या मस्तकावर पाणी थापावं लागलं. आपला ठेवणीतला छब्बा बुवांच्या देहावर चढवावा लागला आणि मग बुवांच्या देहालाच व्यासपीठावर चढवावं लागलं.

संगीतोत्सवाचा पहिला दिवस पहिल्या घासालाच आलेल्या माशीप्रमाणे वेहरेला किळसवाणा वाटला. दुसऱ्या दिवशीचे कलाकार मात्र त्याला सुतासारखे सरळ वागणारे आढळले. त्यातील एक तर गाडीची वाट न पहाता स्वतः टॅक्सी करून मंडपावर आला. सर्व कलाकाराना गाणे सुरू होण्यापूर्वी, गाणे संपल्यावर (आणि जरुर पडल्यास गाणे चालू असताना) चहा पुरविण्याची चोख व्यवस्था भास्करने ठेवली होती. कारण त्याला माहित होते की गाणं रंगतं ते प्रेक्षकानी केलेल्या आणि व्यवस्थापकानी दिलेल्या 'चहा'वर ! परंतु दुसऱ्या दिवशी भास्कर वेहरेला एक वेगळाच अनुभव आला. मध्यरात्रीनंतर गायला बसणाऱ्या गायिकेला त्याने नेहमीप्रमाणे विचारले, "काय घेणार ? चहा कीं कॉफी ?" बाई म्हणाल्या, "मी दोन्ही घेत नाही. एक ग्लासभर हॉर्लिक्स मिळेल का ?" बाईनी "मिळेल का ?" असा सौम्य प्रश्न केला असला तरी त्या प्रश्नार्थी वाक्यामागे आज्ञार्थी प्रयोग होता हे समजायला फारसा वेळ लागला नाही. कारण "एक ग्लासभर हॉर्लिक्स मिळेल का ?" या अस्ताईनंतर त्यानी "हॉर्लिक्स घेतल्याशिवाय आपण गाऊच शकत नाही," असा अंतरा चटकन् जोडला होता. झणकरवाडीत 'हॉर्लिक्स' जवळ वाळगणारा हरीचा लाल सांपडणे मुष्किल होते. वाजारातून ते आणले तर एव्हाना सारी दुकानं वंद झालेली. बाईना जाण्यापूर्वी 'हॉर्लिक्स' लागतं तर तंबोऱ्याप्रमाणे हॉर्लिक्सचा डब्बाहि घेऊन यायला त्याना काय झाले होते ? निदान चालकाना त्यानी पूर्वसूचना तरी द्यायला हवी होती. वेहरेची पुन्हा धावपळ सुरू झाली. उत्सवाला पुनमचंद शेट आल्याचे त्याने पाहिले होते. शेटजींच्या हातापाया पडून भास्करने त्याना आपले दुकान उघडावयास लावले. या धावपळीत पांच पन्नास रुपयाचा चुराडा झाला. परंतु बाईना गायला लावलं हे समाधान अमोल होतं !

यादिवशी आणखी एक मजेशीर घटना घडली. उत्सवाचा मंडप दक्षिणोत्तर बांधला होता. कलाकारानी केवळ 'दक्षिणे'वर डोळा ठेवून गाऊ नये म्हणून कदाचित् असेल पण रंगमंचाचे तोंड उत्तरेकडे ठेवले होते. परंतु एक गायिका पूर्वेकडेच तोंड करून गायला बसली. ही गायिका कदाचित् उदयोन्मुख गायिका असावी, कदाचित् पूर्वापार परंपरेला अनुसरून गाणारी असावी, कदाचित् ती आज पूर्व-कल्याण गाणार असावी, कदाचित् उगवत्या सूर्याला नमस्कार करण्याची तिला संवय असावी. नाहीतर पूर्वेकडे तोंड करून ती गायलाच बसली









अनुक्रमणिका

नसती. त्या बाईच्या चेहऱ्यावरोबर साथीदारांचे मोहरेहि "जा जरा पूर्वेकडे" असा आदेश घेऊन उगवतीकडे वळले. बाईंचा चेहरा श्रोत्यांना नीट दिसेनाच. श्रोत्यांमध्ये विशेषत: गाणं ऐकण्यापेक्षा गाणं पहाण्यासाठी आलेल्या प्रेक्षेकांमध्ये, फारच चुळबूळ सुरू झाली. चालकांनी बाईंना आपला चेहरा फिरविण्याविषयी हळूच सुचविले. वाई म्हणाल्या, "तुम्ही मला अक्कल शिकवू नका. मी 'प्रोफाईल'मध्येच सुंदर दिसते. आणि म्हणूनच मी अशी बसल्ये आहे."

संगीतोत्सवाचा तिसरा आणि शेवटचा दिवस अपघाताशिवाय पार पडला. फक्त त्या दिवशीच्या सरोदवादकाला साथ करणाऱ्या तबलजीने तबल्या-डग्याच्या चुंवळी आणल्या नव्हत्या म्हणून ऐनवेळी वेहरेला फार धांवपळ करावी लागली. साधी चुंवळ नाही म्हणून कोण तारांबळ ! कुणी कापड आणले तर कुणी टॉवेल. परंतु त्या वस्तु चुंवळीचे काम देऊ शकल्या नाहीत. शेवटी वेहरेला नडीसाठी वायकोची साडी आणावी लागली. डगमगणाऱ्या डग्याला आधार देण्यासाठी स्वत:चे धोतर द्यावे लागले. दुर्योधनाप्रमाणे तबलजीने वेहऱ्याचे वस्त्रहरण केले. परंतु वस्त्रहरणाने अब्रू जायच्या ऐवजी उलट राखली गेली.

संगीतोत्सवात भाग घेणाऱ्या कलाकारांपैकी बहुसंख्य कलाकारांच्या बाबतीत झणकरवाडीला आलेला आणखी एक अनुभव म्हणजे, त्यांचे एकतर डोके तरी चढलेले असायचे किंवा आवाज तरी बसलेला असायचा. या कलाकारांची चढलेली डोकी म्हणजे चालकांची डोकेदुखी. पहिल्या दिवशीच्या एका कलाकाराने आपले डोके फार चढले असल्याची तक्रार केली. वास्तविक कीर्ति आणि यश डोक्यात गेल्यावर फार तर गायक 'चढावा', त्याचे डोके चढू नये. कलाकाराची असली नैमित्तिक दुखणी निस्तरण्याचे काम चालकानांच करावे लागते. त्या कलाकारासाठी लगेच अॅस्प्रोच्या गोळ्या मागविण्यात आल्या. त्यानंतर दुसऱ्या एका कलाकाराचेहि डोके कामातून गेले. त्यालाहि अॅस्प्रोची गोळी दिली गेली. परंतु गंमत अशी की अॅस्प्रोने उतरण्यासारखी त्याची डोकेदुखी नव्हती. तिला 'सॅरिडॉन' घ्यायची संवय होती. अनेक मात्रांचे ताल माहीत असलेल्या एका तबलजीच्या डोकेदुखीला 'कोडोपायरिन'-शिवाय दुसरी मात्रा माहित नव्हती. त्यामुळे झणकरवाडीत संगीतोत्सवाबरोबर वेहरेला एक दवाखानाच उघडावा लागला. अॅस्प्रो, अॅस्पेरिन, सॅरिडॉन, कोडोपायरिन, व्हीक्स, अमृतांजन इत्यादि अनेक औषधांचा साठा करून ठेवावा लागला. त्यातल्या त्यात समाधानाची गोष्ट म्हणजे चढलेल्या डोक्यासाठी आणलेले व्हीक्स बसलेल्या आवाजासाठी उपयोगी पडत होते. त्याचा घशाला वाफारा देण्यासाठी उपयोग करता येत होता.

हे झाले गायकवादकांविषयी. श्रोत्यांच्या बाबतीत काहीतरी कथन केल्याशिवाय ही

उत्सवगाथा पुरी व्हायची नाही. वास्तविक संगीतोत्सवाचा सारा खर्च तिकिटाच्या उत्पन्नातून निघावा अशी अर्थसमितीची अपेक्षा होती. परंतु निरनिराळ्या समितीच्या सभासदाना खास आमंत्रित म्हणून बोलावण्याचे व्यवस्था समितीने ठरविले असल्यामुळे चाळीतील बहुतेक सर्व रहिवासी फुकट्यांच्या माळेत जमा झाले. सर्व सभासदानी भरपूर तिकिटे विकण्याचे तोंडभर आश्वासन दिले होते. परंतु संगीतोत्सवाच्या आदले रात्री सर्वांनी तोंडं वाकडी करीत कोरी पुस्तके परत आणून दिली. 'लता असती तर तिकिटे चुटकीसरशी संपली असती.' फुलाजीबुवा असते तर मंडप 'फुल' केला असता 'शकिला वानू असती तर एक तिकीट परत आलं नसतं.' प्रत्येकजण ठरीव कारण सांगत होता. असंख्य समित्यांचे अगणित सभासद, त्यांचे कुटुंबीय आणि मित्रमंडळी, गायकवादकांचा गोतावळा यानी मंडप रोज भरावयाचा पण गल्ला मात्र रिकामाच राह्यचा. फुकट्यांची संख्या कमी करण्यासाठी गेटवर मुद्दाम ठेवलेले स्वयंसेवकहि फुकट्यांचा आंकडा फुगवीत होते आणि उत्पन्नाचा आकडा घटवीत होते. उपन्न वाढावे म्हणून शहरातील मोक्याच्या जागी वॅनर्स लावण्याची आणि गल्लींगल्लीतून हँडबिल्स वाटण्याची व्यवस्था प्रसिद्धी समितीने केली होती. परंतु या पांसष्टाव्या कलेचा उत्पन्नावर काहीही परिणाम झाला नाही. मागाहून असे समजले की वॅनर्स लावणारी मंडळीच दुसऱ्या दिवशी ते वॅनर चोरून नेतात आणि त्याचे चक्क पायजमे शिवतात. हस्तपत्रिका लोकांच्या हातात पडण्याऐवजी हस्ते परहस्ते रद्दीवाल्याच्या दुकानात जाऊन पडतात.

वरे, संगीतोत्सवला गर्दी करणाऱ्या या फुकट्याना शास्त्रीय गायनात काही रस असेल तर शप्पथ. त्यांचा सारा वेळ गाणे ऐकण्याऐवजी चणे फांकण्यात जायचा. वरोवर आणलेल्या पोरांच्या रडगाण्यामुळे गाण्यात लक्ष घालायला त्याना फुरसत नव्हती. सतार वाजो, सरोद वाजो नाहीतर विचित्र वीणा वाजो, सर्वजण प्रत्येक वाद्याला 'तंबोरा'च समजायचे. तंबोऱ्याशिवाय दुसरे वाद्यच त्याना माहित नव्हते. एवढे जाणकार श्रोते मिळाल्यावर संगीतोत्सवाचा वोऱ्या वाजला नाही तरच नवल !

संगीतोत्सवातील प्रत्येक कलाकार कार्यक्रम संपल्यावर झंकारतर्फे प्रत्येक कलाकाराला एक पुष्पगुच्छ दिला जाई. अर्थात् हे काम वेहरेच करी. पहिल्याच दिवशी आलेल्या अनंत अनपक्षित अडचणींमुळे वेहरेची वोवडी वळाली होती. त्यामुळे पहिल्या दिवशींच्या पहिल्या कलाकाराला पुष्पगुच्छ अर्पण करताना "आजच्या कलाकाराला मी झंकारतर्फे "पुच्छगुच्छ" अर्पण करतो असे तो वोलून गेला. आणि सभामंडपात एकच हंशा पिकला. दुसऱ्या कलाकाराला पुष्पगुच्छ अर्पण करायला तो उभा राहतो न राहतो तो पुन्हा हंशा झाला. आणि हातात आणि मनात पुष्पगुच्छ असूनहि त्याच्या वावरलेल्या तोंडातून 'पुच्छगुच्छ' वाहेर पडला. त्यानंतर त्याने प्रत्येक कलाकाराला पुष्पगुच्छ न देता त्याने 'पुच्छगुच्छ'च दिले. संगीतोत्सवाचा इतका वोजवारा वाजल्यावर आणि इतके पुच्छगुच्छ दिल्यावर वेहरेची स्थिति खरोखरच शेपूट तुटलेल्या कोल्ह्यासारखी झाली. नुकसानीत आलेल्या संगीतोत्सवाचे सूप वाजल्यावर 'भास्कर' असूनहि वेहरेला आपले तोंड काळे करावे लागले.

• • •












## हिंदुस्थानी संगीत समृद्ध करणारी कर्तुमकर्तुम शक्ति

# घरबसल्या संगीतसभा

—अभिजित

**शास्त्रीय** संगीताच्या सर्वांगीण वाढीला पूर्व-काळी जसा अनेक त्यागी, विरागी महाभागानी हातभार लावला तसाच आज विज्ञानही लावीत आहे. शास्त्रकार, तंतकार, तालवाद्यकार, वाग्गेयकार, नायक आणि गायक या सर्वांनी रात्रंदिवस एकच एक विचार केला. भारतीय संगीत परिपूर्ण असावे, त्यात कोणतेही न्यून राहू नये यासाठी आपआपल्यापरी अमोलिक भर घालून हिंदुस्थानी संगीत त्यानी समृद्ध केले. कर्तुमकर्तुम शक्तीची. ती समर्थ माणसे युगायुगांना पुरेल एवढा वारसा ठेवून निघून गेली. मात्र त्यांची काया कशी होती, त्यांचा आवाज कसा होता, स्तिमित करणारी त्यांची साधना कशी होती यापैकी काही काही शिल्लक राहिले नाही; परंतु आजच्यासारखीच विज्ञानाची प्रगति तत्कालात थोडीफार असती तर त्यापैकी काही थोडे शिल्लक राहिलेही असते.

आज हाडामांसासकट माणसाला अमर करता येत नसला तरी चित्ररूपाने आणि ध्वनिरूपाने त्याच्या सर्व चालचलणुकीसह त्याला अमर करता येतो. युगपुरुष पं. जवाहरलाल नेहरू आज आपल्यात नाहीत, पण त्यांचा आवाज आज आपण ऐकू शकतो. ते बोलत कसे असत, चालत कसे असत, हसत कसे, रागावत कसे या साऱ्या क्रिया प्रयत्न केला तर पडद्यावर आपण पाहू शकतो.

### निदान एवढे तरी शिल्लक राहिले

ग्रामोफोनचा शोध एडिसनने लावला त्या गोष्टीला आज नव्वद वर्षे उलटली. हा शोध लागल्यानंतर २३ वर्षांनी, म्हणजे १९०१ साली 'हिज मास्टर्स व्हाईस' या अमेरिकन ग्रामोफोन कंपनीची एक शाखा भारतात स्थापन झाली. भारतीय संगीताचे ध्वनिमुद्रण या कंपनीने काहीसे उशिराने सुरू केले. व्यावसायिक दृष्टि ठेवून असो किंवा आणखी कसेही असो ज्या भारतीय संगीतकारांच्या ध्वनिमुद्रिका या कंपनीने घेऊन ठेवल्या त्यामुळे निदान गेल्या पंचावन्न साठ वर्षांचा संगीताचा इतिहास जिवंत राहिला. तत्कालात मैफली गाजविणाऱ्या अत्यंत लोकप्रिय गायिका गोहरजान, जोहराबाई, मलकाजान, मुश्तरीबाई, जानकीबाई, प्यारासाहेब इत्यादि गायक-गायिका आज आपणात नाहीत, पण त्या-वेळचे हे लोक कसे गात, त्यांचे आवाज कसे होते, धाटणी काय होती या गोष्टी तरी या ध्वनिमुद्रिकांमुळे कळून येतात.

### हे व्हायला हवे होते

सतारीये बर्कतुल्ला, इमदादखां, इनायत खां, गवय्ये अब्दुलकरीम खां, यांसारख्या ज्या घरंदाज गवय्याबजवय्यांची मने उदार होती त्यानी आपले ध्वनिमुद्रण करू देऊन आपली कला भावी पिढीसाठी अमर करून ठेवली. तशी बाकीच्यानी ठेवली नाही. गायनाचार्य बाळकृष्णबुवा इचलकरंजीकर, पं. विष्णु दिगंबर पलुस्कर, पं. भास्करबुवा बखले, अल्लादिया खां साहेब, त्यांचे चिरंजीव मंजीखां साहेब प्रभृती गवय्यांचा तो चलतीचा काळ होता. वास्तविक तत्कालिन समाज-धूरिणानी अटोकाट प्रयत्न करून या लोकांचे ध्वनिमुद्रण करायला मास्टर्स व्हॉइस कंपनीला भाग पाडायला हवे होते. त्यांच्या थोडयाशा प्रयत्नाने ते होऊ शकले असते; पण तसे झाले नाही. आणि आज त्यांचे गाणे कसे होते हे काही जाणत्या लोकांची वर्णने ऐकून केवळ कल्पनेनेच ताडणे भाग पडते.

### काही सुरक्षित नमुने

शास्त्रीय संगीताच्या बाबतीत तत्कालात थोडेफार दुर्लक्ष झालेलें असले तरी मराठी रंगभूमीवरील संगीताची गेल्या पन्नास वर्षांची परंपरा व ती लोकप्रिय करणाऱ्या थोर अभिनेत्यांचे गाननैपुण्य मात्र हिज मास्टर्स व्हॉइसने सुरक्षित ठेवले. भावगीतांच्या निमित्ताने नव नवे गायक-गायिका पुढे आल्या.

शास्त्रीय संगीतातील दुसऱ्या पिढीचे कर्तृत्व आणि साधना मास्टर्स व्हॉइसच्या ध्वनिमुद्रिकांमुळेच आपल्याला कळू शकते. सुरश्री केशरबाई, बडे गुलाम अली खां विलायत हुसेन आग्रेवाले, अहमदजान थिरकवा, अफताबे मूसिफी फयाज खां, श्रीमती हिराबाई बडोदेकर, पं. विनायकराव पटवर्धन, पं. नारायणराव व्यास, मास्तर कृष्णराव, सवाई गंधर्व या सर्व ख्यातनाम कलावंतानी आपले ध्वनिमुद्रण करू देऊन आपापल्या घरंदाज संगीतकलेचे नमुने सुरक्षित ठेवले. तिसऱ्या पिढीतील लोकांचे भाग्य असे की, ध्वनिमुद्रणात विशेष प्रगति होऊन अर्धा पाऊण तास चालणाऱ्या ध्वनिमुद्रिका निघू लागल्या.

[पान ५८ वर पहा]

—कै. पं. ज. वि. पेठे

रत्नागिरीचे एक कर्मठ ब्राह्मण कुटुंब. काळ १९०० ते १९३०. . . . त्या कुटुंबात ६-४-१९१० रोजी जनार्दन नांवाचा एक मुलगा अवतीर्ण झाला. घरची परिस्थिती बेताचीच. मराठी पांच यत्ता झाल्या. १९२१ साली इंग्रजी तिसरीत एकाएकी जनार्दनच्या दृष्टीत दोष निर्माण झाला. नजर दिवसेंदिवस वक्रीच होऊ लागली... सर्वांना एका भीषण चिंतेने घेरले... पण तीच आपत्ती 'वरदान' ठरली.

जनार्दनचा थोरला भाऊ शंकर हा नोकरीनिमित्त नाशिकला होता. तो सुट्टीत घरी आला, नि जाताना जनुला उपचारासाठी म्हणून आपल्याबरोबर घेऊन गेला. तेथे जनार्दनची नजर पूर्ववत् तर झालीच. शिवाय एक नवीन, आगळी दृष्टीहि त्याला लाभली.

पं. विष्णु दिगंबर पलुसकर हेहि १९२१-२२ साली नाशिकला होते. चातुर्मासानिमित्त त्यांचे प्रवचन होत असे. १२५ शिष्यांसह शास्त्रोक्त संगीताच्या साथीने जेव्हा ते प्रवचन सुरू होई तेव्हा भक्तिरसाची गंगाच अवतीर्ण होऊन धो धो वहात असल्याचा भास होत असे. शंकर आणि जनार्दन हे दोघे बंधू ती प्रवचनें नियमित-पणे ऐकत. त्यातून संगीताची गोडी जनार्दनचे मनात निर्माण झाली. ती शंकरने ओळखली व आपणहून त्याला पं. विष्णु दिगंबर यांच्या शिष्य-परिवारात दाखल केले. नऊ वर्षांच्या, अत्यंत कडक शिस्तीतील तपश्चर्येनंतर जनार्दनपंतांनी 'संगीत प्रवीण' ही गांधर्व महाविद्या-लयाची पदवी मिळविली. कंठसंगीताप्रमाणेच व्हायोलिन, सितार, तबला व जलतरंग यावर त्यानी प्रभुत्व मिळविले.

पं. विष्णु दिगंबर यांच्या इच्छेनुसार पंडित पेठे (पुढे पुढे जनार्दन-पंताना तेच नांव पडले) १९२८ चे सुमारास लाहोरच्या गांधर्व महाविद्यालयाचे संचालक म्हणून तेथे गेले. त्यावेळी तेथे असलेले श्री. धुंडिराज पलुसकर यांना अन्य शहरी जाऊन संगीत-प्रचाराची इच्छा झाली होती. म्हणून लाहोरचे कार्यक्षेत्र पं. पेठे याना उपलब्ध झाले. तेथे त्यानी त्याकाळीहि आकाशवाणी, लाहोर विद्यापीठ आणि संस्थांतून लौकिक मिळविला. अटकेवर झेंडा फडकाविण्याची जिद्द पं. विष्णु दिगंबर यांची होती. त्याप्रमाणे त्यानी ठिकठिकाणी आपापल्या शिष्यांकरवी गधर्व संगीत महाविद्यालये स्थापन केली. त्या शिष्य-गणातील एक अग्रगण्य शिष्य म्हणूनहि पं. ज. वि. ओळखले जात असत. तेथे उत्तम प्रकारे संगीताचा प्रचार चालू असताना भारताची फाळणी झाल्याने पं. पेठे अत्यंत दुःखी अंतःकरणाने, निष्कांचन स्थितीत पत्नी व मुलगा यासह जीवानिशी सुखरूप भारतात पोहोचले, ही प्रभुचीच कृपा.

नागपूर येथे काही दिवस काढल्यानंतर पंडित पेठे यानी कलकत्ता येथे यावे असे श्री. धुंडिराज पलुसकर यानी सुचविले. त्याप्रमाणे

पं. पेठे फेब्रुवारी १९४८ मध्ये तेथे जाऊन स्थायिक झाले. कलकत्ता येथील नामवंत रसिक पंजाबी सज्जन श्री. दामोदरदास खन्ना यानी स्थापन केलेल्या संगीत विद्यालयाचा ताबा घेतला. भूपेंद्र संगीत विद्यालय आणि कस्तुरबा बालिका संगीत विद्यालय यांचा आजचा बहरलेला तरुवर पं. पेठे यानी जोपासला होता. तेच कार्य करीत असताना २८–३–१९६२ रोजी रात्री काळाने त्याना टिपले. मृत्यूच्या थोडया आधीच (रात्री ९–१५ ला निधन झाले) ते संगीत शिक्षणाचा स्वतःचा वर्ग आटोपून आले होते. प्रकृतीही चांगली होती.

१९३७ साली लाहोर येथे असताना पं. पेठे यांचा विवाह झाला. त्यांचे एकमेव अपत्य श्री. वि. ज. पेठे हे सध्या कलकत्ता येथील व्यापारास वाहिलेल्या एका इंग्रजी साप्ताहिकाचे सहसंपादक आहेत. श्री. वि. ज. पेठे यांच्या मातोश्री कलकत्त्यास मुला-सुनेसह सुखाने रहात आहेत.

**पं. ज. वि. पेठे यांच्या आठवणी म्हणजे १९२८ ते १९४७-पर्यंतच्या संगीत क्षेत्रातील काही वेचक मौक्तिक क्षण होत. त्या आठवणी या अंकापासून सादर करीत आहोत—संपादक ]**

# बिदागीची एक पावली

**आमचे** पूज्य गुरुमहाराज पं. विष्णु दिगंबर पलुसकर यांच्या गुरुजींची आज्ञा घेऊन जेव्हा बाहेर पडले, तेव्हा आपल्या कार्यास सुरुवात कशी व कोठून करावी, हा विचार मनात आला, व आपल्या गाण्याची प्रगति कितपत व कशी आहे ते अजमाविण्याचे त्यानी ठरविले आणि ते सातारा येथे प्रथम गेले. त्यानी त्यावेळचे तेथील सुप्रसिद्ध वकील श्री. दादासाहेब करंदीकर यांचेकडे गेले व "मी गुरुआज्ञेने संगीत प्रचाराचे कार्य करण्यास बाहेर पडत आहे. करता आपण माझं गायन ऐकून मला आशिर्वाद द्यावा व माझ्या गायनाबद्दल खरे मत प्रदर्शित करावे," अशी विनंति त्याना केली. श्री. दादासाहेब हे नाणावलेले विद्वान व संगीतातील दर्दी म्हणूनहि त्यांची ख्याति होती. दादासाहेबांनी गुरु महाराजांचे गायन करविले. काही प्रतिष्ठित मंडळीहि निमंत्रित होतीच. गायनाचा कार्यक्रम चांगला झाल्याची त्यानी ग्वाही दिली. गुरुजींच्या कार्यास शुभेच्छा व्यक्त करून, गायनाची बिदागी म्हणून फूल ना फुलाची पाकळी म्हणून चांदीची एक सबंध पावली हातावर ठेवून निरोप दिला.

थोडावेळ गुरुमाउली दिग्मूढ झाली. पण विचार केला, "हा ईश्वरी प्रसादच आहे. पावली तर पावली. पण त्यानी आदर करून तर दिली. हीच माझी प्रथम मिळकत" अशी भावना ठेऊन त्यानी त्या पावली–प्रसादाला गांठ मारून कित्येक वर्षे संभाळून ठेवले होते.

त्यानंतर गुरुजी उत्तर–भारत, पंजाव, काश्मीर वगैरे ठिकाणी गेले व आपल्या गुणांचे तेजाने स्वयंप्रकाशमान झाले. कोणासारखे ? तर त्यांच्याचसारखे, अशाच स्वरूपात काम ते कार्य करू लागले. मे १९०५ मध्ये त्यानी लाहोर येथे गांधर्व महाविद्यालयाची स्थापना केली. नंतर त्यानी मुंबईच्या सँढहर्स्ट रोडवर चारएक लाखांची अवाढव्य चार मजली इमारत उभी केली. दोनशे विद्यार्थ्यांना जेवण व शिक्षण मोफत देऊन संगीत प्रचाराचे कार्य गुरुमाऊलींनी धुमधडाक्याने सुरू केले.

काही काळानंतर गुरुजीना पुन्हा सातार्‍याला जाण्याचा प्रसंग आला. तेथे ते एका विशेष समारंभाला जाणार होते. सातारा रोड स्टेशनवर उतरताच, तेथे दादासाहेबांची मूर्ति ! "प्रथम माझे घरी चरणधूळ झाडावी व जलपान करून नंतरच प्रमुख समारंभास जावे". ती आज्ञाच समजून गुरुजी प्रथम त्यांच्या घरी गेले. तेथे जलपान झाले. नंतर श्री. दादासाहेब यानी गुरुजींच्या हाती १००१ रुपयांची थैली दिली व ते म्हणाले, "माझ्या घरी जे पहिले गाणे तुम्ही केले, त्याची ही खरी बिदागी. त्याचा स्वीकार करावा. मी त्यावेळी इतके रुपये तुम्हाला मुद्दामच दिले नाहीत. कारण प्रथमच इतके रुपये पाहून तुमची दृष्टी कदाचित् बदलण्याचा संभव होता. व इतके अफाट कार्यही तुमचे हातून कदाचित् होऊ शकलेही नसते. तरी त्यावेळी पावली दिल्याबद्दलचा राग मनात धरू नये. आता रुपये योग्य कारणीं लागतील यात शंकाच नाही."

# गोवधबंदी नि गायन

☆☆

फार फार वर्षांपूर्वीची गोष्ट. लाहोरला त्यावेळी गोवधबंदीची चळवळ मोठ्या प्रमाणात सुरू होती. जिकडे तिकडे सभा, निदर्शने वगैरे चालूच होती. त्यावेळी एक गृहस्थ मजकडे आले; व म्हणाले, "पंडितजी इस इतवारको हम एक जलसा गोवध बंदी के उपलक्षमे कर रहे हैं. अतएव कृपया आपका उसका सभापतित्व ग्रहण करें."

**पं नारायणराव व्यास यांचे गुरुबंधू आणि लाहोर येथील गांधर्व संगीत विद्यालयाचे संस्थापक कै. पं. ज. वि. पेठे यांच्या आठवणी या अंकापासून सादर करीत आहोत. त्या कशा आहेत ते ठरविण्याचे काम अर्थातच आमच्या रसिक वाचकांचे....**

मग काय, आले अंगावर, घेतले शिंगावर, या न्यायाने त्या कार्यास प्रवृत्त झालो. दोन चार दिवसांची वर्तमानपत्रे घेऊन गोवधबंदीवरचे चालू लेख व टिपणे वाचून काढली. त्यातल्याच काही मोठ्या लोकांच्या अभिप्रायाचे टांचण करून त्यावर थोडी थोडी आपली मल्लिनाथी करून, दहा मिनिटांचे अध्यक्षीय भाषण घोटून ठेवले.

ठरलेल्या दिवशी त्या कार्यक्रमाचा अध्यक्ष म्हणून खुर्ची सुशोभित केली; व दहा मिनिटांचे घोटीव भाषण ठोकले. गोवधबंदीचा ठराव मंजूर करून तो सरकारकडे धाडण्याचे ठरले. नंतर सुमारे अर्धा तास माझे गायन होऊन कार्यक्रम संपला. अर्थात् दुसर्‍या तिसर्‍या दिवशी वर्तमानपत्रात नांव व फोटो पण छापून प्रसिद्ध झालेच. व 'येन केन प्रकारेण प्रसिद्धि पुरुषो भवः' ही उक्ति सार्थ ठरली.

☆☆






## संगीत एप्रिल फूल !!

लाहोरच्या वास्तव्यात एकदा काही लोकांच्या डोक्यात मार्च अखेरीस एक सुपीक कल्पना निघाली. त्यातच अस्मादिक व आमचे जानी दोस्त वि. म. कु. हेहि होतोच. त्याच सुमारास पंडित नारायणराव व्यास यांचा लाहोर-रेडियोवर एक कायक्रमही होता. हा मात्र निव्वळ योगायोग हं. त्याचा फायदा घेऊन व इतर काही मित्राना विश्वासात घेऊन तो कार्यक्रम नक्की केला. संयोजकांमध्ये ज. वि. पे.; वि. म. कु. व चोवे ही मंडळी प्रमुख होती. वि. म. कु. चा प्रेस असल्याने तेथे झक्कपैकी आमंत्रण पत्रिका—अगदी ए-वन तऱ्हेच्या—सेक्रेटरी महाराष्ट्र मंडळ यांच्या नावाने छापून घेतल्या.

पं. नारायणराव व्यास यांच्या गाण्याचा कार्यक्रम एक एप्रिल रोजी होणार आहे. तरी महाराष्ट्रीय बांधवांनी सहपरिवार उपस्थित रहावे, अशी विनंति करण्यात आली होती. तिला पुष्टी मिळावी. म्हणून श्री. व्यास याना आम्ही काही बड्या मंडळींकडे आदले दिवशी सहजच म्हणून भेटावयास घेऊन गेलो होतो. त्या ठिकाणी जलशाचा उल्लेख होणार नाही वा झालाच तो अधर अधर उडवून लावण्याची दक्षताही आम्ही घेतली. खुद्द व्यास बरोबर असल्याने 'उद्यांच्या' कार्यक्रमाविषयी विश्वास निर्माण झाला. मात्र श्री. नारायणराव याना त्या कशाचाच सुगावा लागू न देण्याचीहि खबरदारी घेतली होती.

रात्री नऊ वाजता कार्यक्रम सुरू होण्याचे जाहीर झाले असल्याने, बरीच मंडळी साडेआठपर्यंत जेऊन खाऊन येऊन पोहोचली होतीच. त्यात सौ. सरोजिनीबाई देशपांडे, श्री. बाळासाहेब आगटे, नाडकर्णी, ठाकूर–मंडळी, पाध्ये वगैरे प्रमुख लोक होते. गाण्यास वर्गणीपण काहीच नसल्याने मंडळींची भाऊगर्दीही विशेषच झाली होती. आम्ही मात्र मनातून खुदखुदतच होतो. लोकांच्या डोळ्यात धूळ फेकण्यासाठी तानपुरे, तबला, हार्मोनियम पण वेळेच्या अर्धा-तास पूर्वीच येऊन दाखल झाले. त्यामुळे तर लोकांची खात्रीच झाली. नऊ वाजले. तरी नारायणराव मात्र बेपत्ता. तेव्हा लोकांची चुळबुळ सुरू झाली. ते चौकशी करू लागले. आम्ही म्हणालो, 'आत्ता येतच आहेत ते."

इतक्यात, शेजारच्या खोलीत ग्रामोफोन वाजू लागला. आणि "नीर भरन कैसे जाऊं" हे पद नारायणराव मालकंसात गाऊ लागले. त्याबरोबर श्री. चोवे यांनी समोरच्या एका वस्तुवर आच्छादलेला (अंगीठी) पडदा बाजूला केला. तोच त्याचे खाली सुवाच्च अक्षरांमध्ये 'एप्रिल फूल' लिहिलेले सर्वांना दिसले मात्र. सगळ्यांचीच हसतां हसतां पुरेवाट झाली. काही मंडळी चिडली व म्हणू लागली की असली कसली मेली ही चेष्टा ! इतक्या दुरून व्यासांचे गाणं ऐकावयाला आलो ते उगीचच ! आणि तसे पुटपुटतच परत निघाली. आम्ही मनात म्हटले, "मग आणखी कशी चेष्टा करावयाची, ते यानाच विचारले पाहिजे." लोक परत निघून जात असताना श्री. व्यास अगदी सहजगत्या तेथे आले. त्यानाही तो प्रकार समजताच, खूपच गंम्मत वाटली. ☆☆

## फ्रेंच युवतीची शिकवणी

आयुष्यात केव्हा कसकसे प्रसंग येतील किंवा येतात हे त्या ब्रह्मदेवाशिवाय कुणालाच कळत नसावे, बहुधा ! असाच एक प्रसंग, पण गंमतीदार, मला लाहोरला अनुभवण्यास मिळाला.

एक दिवस माझी एक शिष्या कु. बाला अग्निहोत्री हिचे बंधू एका सद्गृहस्थाला घेऊन मजकडे आले. मिस्टर प्रकाश कुमार शास्त्री, बार-अॅट-लॉ अशी त्यांची ओळख करून देण्यात आली. त्यांच्या मिसेसना सितार शिकावयाची आहे व तीही आपणाकडूनच. तेव्हा वाटेल ते करून निदान आठवड्यातून दोनदा तरी त्यांचेसाठी वेळ काढाच, अशी गळ श्री. अग्निहोत्री यानी श्री. शास्त्री यांचे-तर्फे घातली. मी त्याना विचारले, की त्या अगोदर कोठे सितार शिकल्या आहेत की नवीनच आहेत ? ते म्हणाले, ती व्हायोलिन वाजविते. पण इंग्लिश म्युजिक वाजवते. सितार मात्र हिंदुस्तानी पद्धतीनेच शिकणार आहे.

सर्व बोलणी झाल्यावर मी त्याना शिकविण्याचे कबूल केले; व ठरल्याप्रमाणे त्यांच्या बंगल्यावर गेलो. बाहेरची बेल वाजविताच दार उघडून अठरा वीस वर्षाची गौरवर्णीय युवती, केसांचा बॉबकट, अंगात फ्रॉक अशा थाटात समोर येऊन उभी ठाकली. मला वाटले, मी घर तरी चुकलो किंवा शास्त्री यांचा हा ब्लॉक नसून दुसरा असेल, असा क्षणभर विचार येतो न येतो, तोच त्या युवतीने इंग्रजी-तच प्रश्न केला, Are you Pat. Janardan ? मी Yes म्हणताच तिने मला आत बोलावले. बैठकीच्या खोलीत बसवून पंखा सुरू केला. माझे डोळे सुन्न होते की काय, असा भास मला थोडा वेळ झाला. पण गुरुकृपेने कसल्याही प्रसंगास न भिता दाद द्यावयाची मनाची तयारी असल्याने येणाऱ्या प्रसंगाची वाट पाहू लागलो. इतक्यात त्या युवतीने आतून सितार आणली व मजपुढे ठेवली. ती युवती म्हणजेच श्री. शास्त्री यांची बायको, हे मला त्यावेळपर्यंत समजले नव्हते. मग एकदम कल्पना आल्यावर स्थिरावलो. श्री. शास्त्री त्यावेळी घरी नसल्यानेच तो घोटाळा झाला होता.

मनात विचार आला की, या आंग्ल बाईना आपल्या पद्धतीने सितारीचे शिक्षण कसे द्यावे? मनात गुरुचरणाचे ध्यान करून प्रथम धडा सा रे ग म प ध नि सा चा दिला. तो अर्धा तास सारखा घोटून घेतला. आणखी दोन तऱ्हा अभ्यासासाठी देऊन ठेवल्या. अशा तऱ्हेने पहिला दिवस कसाबसा पार पडला. पुन्हा तीन दिवसानंतर त्यांचेकडे जावयाचे होते. म्हणून त्या काळात शिकविण्याची मनाची पूर्ण तयारी करून धडे कसकसे द्यावयाचे हे ठरवून टाकले. नाहीतरी आत्तापर्यंत आयुष्यात कुणीही कसेही शिकणारा-शिकणारी व्यक्ति आली तरी, कसे शिकवावे हा प्रश्नच पडला नव्हता. स्वप्नातसुद्धा शिकवू शकेन इतका आत्मविश्वास होता व आहेही. असो.

त्या बाईचे शिक्षण सुरळितपणे सुरू झाले. भाषेची अडचण पडे. कारण इंग्रजीमधून शिकविण्याचा अभ्यास नव्हताच. व इंग्रजीची पुंगीहि यथातथाच होती. त्यामुळे जरा अडचण भासे.






अनुक्रमणिका

परंतु यातूनही मार्ग काढला. एक म्हणजे बोलणे कमी, कृति जास्त. कारण हे प्रात्यक्षिक असल्याने समोर दिग्दर्शनच करून उपयोग लवकर होई. व संगीतांतील शास्त्रीय शब्दांचे इंग्रजी-मधे रुपांतर करून त्यावरून बाईंना समजेल असे समजावून देऊ लागलो. त्यामुळे माझाही थोडाथोडा अभ्यास वाढलाच. अशा पद्धतीने शिकविणे सुरू झाले. हा लाभच म्हणावयाचा.

सौ. शास्त्री याही नियमितपणे अभ्यास करीत व शिकावयास कांकू कधीहि करीत नसत. त्यामुळे त्यांची प्रगति भराभर होऊ लागली. त्यानी स्वरलिपी हिंदीतूनच लिहिण्याचे ठरविले. व मजकडून हिंदीमध्ये सा रे ग म प ध नि ही अक्षरे एका कागदा-वर लिहून घेतली. तसेच स्वरलिपीची इतर बोधचिन्हेही! त्यानंतर जेव्हा मी ठराविक दिवशी त्यांचेकडे गेलो, तेव्हा त्यानी उभ्या चार पाच वंद कागदावर माझ्या स्पष्ट अक्षराची हुबे-हुब नक्कल केली होती. ती इतकी की ते अक्षर माझे कीं त्यांचे, हे मलाच ओळखणे जड झाले. मी आश्चर्यचकितच झालो, नि मनाशी खूणगांठ बांधली की ह्या बाई नक्कीच प्रगति करणार. त्यांचे शिक्षणे व्यवस्थितपणे सुरू होते. व त्या माझ्या शिकविण्या-विषयीही मधून मधून समाधानकारक उद्‌गारही काढत असत. जेव्हा जेव्हा शिकवणीनंतर त्याना वेळ मिळत असे तेव्हा तेव्हा त्या स्वतःच्या गाडीतून मला घरापर्यंत पोहोचविण्यास स्वतः येत असत. मला प्रथम प्रथम संकोच वाटे. पण मग धीर चेपला. थंडीचे दिवसात त्यांचे घरी गेल्यावर चेस्टर उतरवण्यास व परत जाताना चढविण्यास स्वतः त्या येत. मी दोन चार वेळा त्या गोष्टीला नकार दिला. पण त्या ऐकेचनात. व नियमितपणे त्या गोष्टी व्हावयाच्याच. नाहीतर आमच्या बायका! दुसऱ्याच्या अंगावर कधी कोट चढवतील? अब्रह्मण्यम्! नुसती कल्पना सुद्धा नको... अशा रीतीने शिकवणी चालू असताना एक दोन वेळा त्या उभयतानी मला जेवणाचा पण आग्रह केला. त्यावेळी त्यानी माझ्या आवडीचे पदार्थ केले होते. बाई स्वतः स्वयंपाक करीत. ते पाहून मला आश्चर्य वाटे. त्यानी मला आपले व्हायोलिन पण दोन चार वेळा ऐकविले होते. सितारीच्या तीन चार गति विस्तार–तोडेसहित तबल्याचे साथीवर त्या वाजवू लागल्या. त्यामध्ये त्यांना आनंद पण वाटत असे. विशेष म्हणजे प्रथम धडा नीट सर्व बाजूनी चांगला वाजविता येऊ लागल्याशिवाय पुढचा धडा मागण्याची घाई त्यानी कधीहि केली नाही. नाहीतर आमचा विद्यार्थी! पहिला धडा पूर्ण होतो न होतो तोच अधाशासारखा दुसरा मागून घेतात; व तो पचला नाही, म्हणजे शिकायचे जीवावर येते त्यांच्या!

आमच्या गांधर्व महाविद्यालयात दर पंधरा दिवसांनी–रवि-वारी–विद्यार्थ्यांची गाणा–बजावण्याची संगीत–सभा होत असे. वर्तमानपत्रात जाहीर करून लोकानाही आम्ही निमंत्रण–अर्थात फुकटचेच–देत असूं. सहजच संस्थेचा प्रोपगेंडा होत असे.

[पृष्ठ ५९ वर पहा]




## पांचवे जॉर्ज यांचा मराठी नाट्यभूमी-तर्फे झालेला संगीत सत्कार

२२ जून १९११ हा दिवस सर्व हिंदुस्थानभर सणाप्रमाणे गुढ्या-तोरणे उभारून दिव्यांची रोषणाई करून मोठ्या आनंदाने, उत्साहाने धामधुमीने साजरा झाला. कारण त्या दिवशी हिंदुस्थान देशाचे सार्वभौम बादशाहा पांचवे जॉर्ज इंग्लंडच्या गादीवर बसले.

राजनिष्ठ नागरिकांनी अनेक वेगवेगळे कार्यक्रम आखून आपली राजनिष्ठा प्रकट करण्याची ही सार्वजनिक संधि साधली. महाराष्ट्र त्यात मागे पडला नव्हता. कवींनी या मंगल प्रसंगाच्या निमित्ताने खास कवने रचली. कलावंतांनी नाट्यप्रयोगाच्या वेळी रंगभूमी-वरून जनतेला ती कर्णमधुर चालीत गाऊन दाखविली.

रंगभूमी मासिकाच्या जुन्या अंकात ही पदे दिली आहेत ती मनोरंजकही आहेत.

लोकमान्य टिळकांनी ज्या नाट्यसंस्थेला 'ही माझी कंपनी आहे' अशी शिफारस दिली होती त्या किर्लोस्कर कंपनीलासुद्धा हे करावे लागले, असे दिसून येते.

**किर्लोस्कर संगीत मंडळीने** राज्यारोहणानिमित्त म्हटलेली पदे–

पुणे– किर्लोस्कर नाटकगृह ता. २२ जून १९११ रोजी दिवसा
[रा. रा. राम गणेश गडकरी अभिवादन करीत]
अभिनंदन करितो प्रांजली । मंगलकाळीं ।।धृ.।।
प्रजाननांच्या मंगल वचनी
वाद्ये वाजती सकलहि भुवनी
शुभलग्नी सुमनोहारानी
श्री वसुंधरा तुज वरूनी ।। पावन झाली ।।१।।
पितामहीसम अमरमुखाने
सेवि भूवरी त्रिभुवन नृपते
जी शोभा दे तव जनकाते
शांतवृत्तिला त्या होते ।। बसवी भाळीं ।।२।।








क्षमादया गुण किरणी रमवी
सदाहि भूपा वसुधा देवी
जन सारे सदया करि तेवी
तव कृपा चंद्रिका जाली ।। वैभव शाली ।।३।।

राष्ट्रीय गीत

माधव नारायण पाटणकर

**पाटणकर संगीत मंडळी**

राज्ञी माता तनयज चिरसुख भारतवासी जनां
दैवे आम्हा लाभली ही जॉर्ज मेरी नृपलालना
राज्य सुखाने भूपाने चिरकाल करावे शांतीने
हेचि प्रभूला मागावे निशीदिनि नमुनि तच्चरणा
अर्ध क्षितितल । भूपाचे बल । व्यापुनि राहे उदधीला
साम्राज्यावरि विभव रवि । निसतत उगवो भूदेवी
अरिभय । अपजय । करू लय ईश्वर । मेरी नृपा
विजयोऽस्तु म्हणा ।। धृ.।।

**नाट्यकला प्रवर्तक संगीत मंडळीने** म्हटलेली पदे

(रा. रा. गो. र. आपटेकृत)

नमन सुमनी पदाला ।। प्रभुवर
सकल सूत्रधर व्यापक स्थिरचर ।। धृ.।।
श्रवण करी नतजन विनंतीला ।। आंग्र. जॉर्ज भूपति
राज्ञी मेरी याप्रति ।। आयुकीर्ति शुभा
चिरसुख विभवा ।। अविरत दे कुशला।।१।।

**—संग्राहक के. टी. देशमुख**

[ पृष्ठ ७ वरून – संगीत–शास्त्र ]

टिकली नाही. अकबराच्या पदरी असलेल्या तानसेन, प्रभृति दहाबारा संगीत विशारदांचा 'ऐने अकबरी'काराने उल्लेख केला आहे व हल्ली आमच्या गायन विद्येला जे मुसलमानी वळण लागलेले दिसते ते त्यांच्या मुळेच असे मानण्यास प्रमाण आहे. तथापि पुढे पुन्हा धामधुमीचा काळ आल्याने ही विद्या सर्वपरिगृहीत न होता गाणारांचा व गाणारणींचा स्वतंत्र वर्ग बनून देशात आळस, व्यसने व हलकटपणा यांचा मात्र फैलाव झाला.

इंग्रजी राज्य झाल्यापासून नवीन मन्वंतर सुरू झाले. चोहोकडे कायमची शांतता स्थापन झाल्यामुळे कलाकौशल्यास उत्तेजन देण्याकडे लोकांचे लक्ष लागू लागले व त्याबरोबरच आजपर्यंत सभ्य लोकांच्या समाजातून हद्दपार झाल्याने चिखलात लोळत पडलेल्या गायन विद्येचाही उर्जित काळ आला. खुद्द महाराष्ट्रात पेशवाईमध्येच ह्या विषयाकडे लोकांचे लक्ष लागले असल्यामुळे ब्रिटीश अंमलापूर्वी ह्या बाबतीत सुधारणा होऊ लागली होती. विषयलंपटास प्रिय होऊन बसलेले पूर्वीचे ख्याल टप्पे जाऊन वीररसप्रधान पोवाडे होऊ लागले. फडाच्या लावण्यास व छकडीस लुब्ध झालेल्या वेअक्कल लोकांस ताळ्यावर आणण्याकरिता रामजोशी, आनंद फंदी प्रभृतीनी चालीला चाल व सुरास सूर देण्याचा मार्ग पत्करला व हरदासानीही तराणे, धृपदे इत्यादिकांच्या साह्याने प्राकृतजनांस कडू लागणारा वेदान्त शर्करावगुंठीत करण्याची शक्कल काढली. इतर प्रांतातूनही कबीर, सूरदास वगैरे भगवत्भक्तानी संगीत पदांच्या द्वारे आपले अमोलिक विचार लोकप्रिय करण्याचा प्रयत्न केला होता. तथापि मुख्यत्वेकरून ही कला हलकट लोकांच्या हातात सापडल्यामुळे व अशा लोकाना आश्रय देणारे श्रीमंत लोक विषयासक्त व अक्षरशून्य असल्यामुळे त्यांच्या प्रयत्नाचा फारसा उपयोग झाला नाही व गायनवादन म्हणजे चैनबाजीचे एक अंग व विषयवासना प्रदीप्त करण्याचे साधन अशी लोकांची समजूत कायम राहिली. असो.

हल्ली ती सर्व स्थिती नाहीशी होत चालल्याने प्रस्तुत विद्येचे पुनरुज्जीवन करण्याला निराळाच मार्ग स्वीकारला पाहिजे. अयोग्य लोकांच्या तावडीत सांपडून कवडीमोल झालेली ही विद्या सभ्य लोकांच्या समाजात परत आणण्याची किती आवश्यकता आहे हे वरील विवेचनावरून ध्यानात येईलच. नैसर्गिक अभिरुची तृप्त करण्याकरिता हलकट लोकांशी सहवास करावा लागल्यामुळे आपल्यामध्ये दुर्गुणांचा कसा फैलाव झाला आहे, याचा जो कोणी क्षणभर विचार करील त्याची, या दुर्जनसंगदूषित विद्येस प्रायश्चित देऊन, पावन करून घेणे हा केवळ रिकामपणाचा व्यवसाय नसून, हल्ली अत्यंत आवश्यक असलेल्या सामाजिक व नैतिक सुधारणांपैकी एक प्रधान उपाय आहे, अशी खात्री होईल. ज्यांचे दर्शनही पापकारक वाटावे अशा वारवधूस लग्नासारख्या समारंभात किंवा पवित्र देवालयातून किंवा कुलीन गृहस्थांच्या घरोघरी राजरोसपणे पाचारणे होऊन अग्रासन देण्यात येते याहून लांछनास्पद अशी कोणती गोष्ट आहे? प्रथमतः मधुर गानाच्या नादाने वेडावून जाऊन पुढे पन्यांगनांच्या नेत्रकटाक्षात गुरफटणारे फंदी किती आढळतात बरे? ज्या केलेचा उपयोग केवळ अंतःकरणातील सद्वृत्ती जागृत करण्याकडे व दुर्विकारांचा उच्छेद करण्याकडे व्हावयाचा ती विद्या व्यसनांची पुरस्कर्ती, दुराचरणाचे द्वार व जगातील अतिनिंद्य मानलेल्या वस्तूंची सहचारिणी व्हावी हे खचित उचीत नाही. सारांश, हा कुसंगतीचा कलंक धुवून टाकून तिला पुन्हा उर्जित दशा आणणे हे सर्व शिष्ट लोकांचे काम आहे. असो! गेल्या आठदहा वर्षात ह्या संबंधाने लोकरुचीत मोठेच अंतर पडले आहे व त्याचे श्रेय सर्वस्वी कवी कुलगुरूच्या रसभरीत वाणीस संगीताची जोड देणाऱ्या कै. किर्लोस्करांसच दिले पाहिजे. गल्लोगल्ली सुभद्रेचे विलाप ऐकू

येऊ लागले व पूर्वी लपून छपून कधी काळी फडकणाऱ्या छकडीवजा चाली सभ्य पुरुषांच्या व बायकांच्याही तोंडी खिळून गेल्या. संगीताची एकाएकी ही जी साथ फैलावली त्याला कारण बलवंत कवींच्या "तिखटची" करण्याने ही नवीन उत्पन्न झालेली गायनाभिरुची होय यात संशय नाही. आता घरोघर ताना मारणारे गवयी किंवा संगीत-शाकुंतलापासून तो सत्यनारायण कथेपर्यंत किंवा त्याच्याहि पलिकडील विषयावर भराभर प्रसिद्ध होणारी कवडीमोल संगीते अभिज्ञ लोकांच्या उपहासास कारण होत असतील. तथापि कोणताही नवीन प्रकार प्रथमच व्यवहारात आल्यामुळे जो एक प्रकारचा अतिरेक होत असतो त्याचेच हे एक उदाहरण आहे! व तो क्षणिक असल्यामुळे त्यापासून होणाऱ्या तोटयापेक्षा फायदाच विशेष होतो हे ध्यानात ठेवले पाहिजे. सारंगीच्या नादावर शांतीपाठ किंवा प्राकृत गाणाऱ्या राधाजीपेक्षा किंवा सारसापारिल्याने नाटकातील रावणासही हटविणाऱ्या उस्तादखांपेक्षा सुभद्रेच्या अरसिक शेल्याने जर लोकांचे अधिक चित्तरंजन होऊ लागले तर ही एक सुधारणाच म्हटली पाहिजे. परंतु येणेकरून खऱ्या शास्त्रीय विद्येचे पुनरुज्जीवन झालेसे मात्र होत नाही. उलट नाटकात, जेवणात, रस्त्यात जिकडे तिकडे लहान मोठयांच्या तोंडी हे संगीत बोकाळल्यामुळे गुरुपरंपरा नाहीशी होऊन एकंदर कला अशुद्ध, शास्त्ररहित व कर्णकटू होण्याची भीति आहे. एवढ्याचकरिता ह्या नवीन उत्पन्न झालेल्या अभिरुचीला वेळीच योग्य वळण लावणे व तेणेकरून एकेकाळी पूर्वी सार्वत्रिक झालेल्या प्रस्तुत मनोरम कलेचे पुनरुज्जीवन करणे हे तत् अभिज्ञांचे कर्तव्य आहे. आपल्या पूर्वजांनी ह्या विषयावर किती परिश्रम केले होते याची शार्ङ्गधर, पारिजात, रत्नाकर वगैरे मान्यवर ग्रंथ चांगली साक्ष देतात; परंतु त्यांचा आता मागमूसही लागणे कठीण झाले आहे. गुरुपाशी दोनचार वर्षे शागिर्दी करून मिळविलेल्या अर्ध्यामुर्ध्या, पांचपंचवीस चिजा ही काय ती हल्ली गवयी म्हणविणारांची पूंजी! परंतु स्वरांची मांडणी, रागांची उपपत्ती, वर्ज्यावर्ज्य, मिश्रसंकीर्ण राग इत्यादी ठोकळ गोष्टींविषयीही एकाला माहिती असेल तर शपथ. धंदेवाल्यांची ही अवस्था मग इतर लोकांची तर गोष्टच बोलावयास नको. ही स्थिती सुधारण्याला अर्थात शास्त्रीयरितीने या विद्येचे शिक्षण सुरू झाले पाहिजे, त्यात हल्लीच्या काळाला अनुरूप असे फेरफार केले पाहिजेच व 'गकार' पंचायतनात नेऊन बसविलेली गायन विद्या पुन्हा कुलीन लोकांच्या आदरास पात्र होईल असे केले पाहिजे. ह्या कामी कोणते उपाय योजिले पाहिजेत हे येथे सांगण्यास सवड नाही व आमच्यापेक्षा तद्भिज्ञ लोकासच ते लवकर सुचणार असल्यामुळे जरूरही नाही. तथापि हल्ली चार गोष्टी विशेष आवश्यक दिसतात त्यांचा येथे उल्लेख करणे रास्त दिसते (१) प्राचीन ग्रंथाचा शोध करून छापणे, (२) सर्वसंमत होईल अशी गायन लिपी शोधून काढणे, (३) हिंदू व युरोपियन गायनांचे होईल तितके संमेलन करणे, (४) ठिकठिकाणी गायन समाज स्थापणे. हल्ली पुण्याप्रमाणे आणखीहि दोन चार ठिकाणी असले समाज स्थापन झाले आहेत खरे; परंतु त्यांची व्यवस्था चांगल्या लोकांच्या हाती नसल्यामुळे तादृश फायदा होत नाही. गायकवाड सरकारानी आपल्या राजधानीत दोन गायनशाळा स्थापल्या आहेत; व यंदा एक विद्यार्थी पाश्चात्य गायन शिकण्याकरता मुद्दाम विलायतेस पाठविला आहे. तसेच मुंबईस प्रसिद्ध काबाजी शेठ यांनी पारशी व गुजराथी लोकांत गायनाभिरुची वाढविण्याचा अव्याहत क्रम चालविला आहे. तशाच प्रकारचे आमच्याकडे प्रयत्न झाले पाहिजेत.

●●●

(केसरी : २३ ऑगस्ट १८९२ : अग्रलेख 'केसरी'च्या सौजन्याने)



## आपमतलबी जिभेची भाषा

**शिक्षणामध्ये जे विषय योजण्यात येतात, त्यांचा हेतू ज्ञानेंद्रियाना व कर्मेंद्रियाना चालना देवून त्याना स्वतःच्या अनुभूतीने ज्ञानग्रहण करता यावे हा होय. या सामान्य नियमावरून अवगामी पद्धतीने उतरल्यास आपणास आपोआपच या निर्णयावर यावे लागले, की मनुष्याचा कंठ हे देखील एक इंद्रिय आहे. आणि कंठाचा उपयोग नुसत्या बोलण्याचा नसून त्याहून श्रेष्ठ प्रतीचा आहे. कंठाच्या तारा या हृदयाच्या ताराशी जोडलेल्या असतात. म्हणून कंठातुन निघणारे सुर कृत्रिमपणा व लाघवीपणा या जिभेतून निघणाऱ्या भाषेच्या दोषापासून मुक्त असतात. 'ध' चा 'मा' करण्याची विद्या व मखलाशी भाषेस पूर्ण अवगत असल्यामुळे तिने शिक्षण शास्त्रज्ञाना आजपर्यंत चकवून स्वतःचाच समावेश शिक्षण पद्धती करून घेतला, व संगीतास मागे ठेवून दिले. परंतु भाषेचा हा आपमतलबीपणा आमच्या लक्षातहि येवू नये ?**

अनुक्रमणिका











# संगीताचे श्रेष्ठत्व आजची 'लोक [गर्दी] शाही' ठरविणार काय ?

[ स्वातंत्र्योत्तर काळात गल्लीतील संगीताने एकीकडे ग्रामपंचायत व दुसरीकडे दिल्लीपर्यंत मजल मारली आहे आनंदाची, समाधानाचीच बाब आहे ती. पण ती वृद्धी संख्यात्मक तर होत नाही ना ही शंका अधून मधून अस्वस्थ करते.

संगीत प्रचाराला गुणवत्तेची जोड मिळाली तरच भारतीय संगीत सुगम तसेच शास्त्रोक्तही बहरेल, असा विश्वास. म्हणून आमची ही शंका काही दर्दी रसिकांपुढे आम्ही प्रश्नरुपाने मांडली होती. काहींनी तिचे निवारण निरुपणात्मक पद्धतीने केले आहे, तर काहींनी प्रत्येक प्रश्नावर अलग अलग विचार मांडले आहेत.

रसिक वाचकांचे माहितीसाठी ती प्रश्नावली प्रथम देत आहोत. त्यानंतर त्यांची विविध पैलूंनी नटलेली उत्तरे —संपादक]

( १ ) आज शास्त्रीय संगीत लोकाभिमुख झाले आहे, असे तुम्हास वाटते काय?

( २ ) लोकाभिमुख व लोकप्रिय झाल्याने त्याची पातळी खालावली आहे, असे वाटते का?

( ३ ) जर ती खालावली असेल, तर ती वर आणण्यासाठी नेमके काय प्रयत्न करावेत? त्यासाठी सरकारी व बिनसरकारी संस्था ह्यानी काय काय भाग घ्यावा ?

( ४ ) संगीताच्या मैफलींना जमणाऱ्या श्रोतवृंदांच्या रसिकतेबद्दल तुमच्या किमान अपेक्षा काय आहेत?

( ५ ) त्या अपेक्षा आज ठिकठिकाणी भरणाऱ्या संमेलनातून पूर्ण होतात काय?

( ६ ) नसल्यास त्या साध्य होण्यासाठी काय करावे?

( ७ ) जर संगीत शिक्षण हा त्यातील एक उपाय असेल तर रसिक श्रोता बनण्यासाठी खास संगीत शिक्षणाची सोय करावी काय?

( ८ ) शास्त्रीय संगीतास सरकारी मान असूनहि त्याविषयी विशेष संशोधन केले जात नाही. ह्यास काय कारण आहे? तात्काळ मिळणारी लोकप्रियता हे असू शकेल काय?

वरील प्रश्नांतून निर्माण झालेल्या व मूळ विषयास धरून एकाद्या मुद्यावर आपणास विशेष लिहावयाचे असेल तर त्याहि मजकूर जरूर असावा.






**आपचे अभिजात शास्त्रीय संगीत हे शास्त्र आणि कला यांचा अत्यंत मधुर आणि तितकाच तेजस्वी संगभ आहे. संगीत विद्येची साधना म्हणजे जन्म-जन्मांतरीचे व्रत....असे संगीतातील एक विचारवंत डॉ. ना. र. मारुलकर म्हणतात.**

# ‘रमवी चित्त न ज्याचे....’

**आमचे** अभिजात शास्त्रीय संगीत हे शास्त्र आणि कला यांचा अत्यंत मधुर आणि तितकाच तेजस्वी संगम आहे. या विद्येची प्रत्यक्ष साधना हे एक जन्मांतरीचे व्रत आहे. अर्थात् अशा या सखोल कलेचे रसग्रहण योग्य अधिकाराने करता येणे हीही एक कठोर तपःश्चर्याच आहे. कलावंत होण्यापेक्षाही खरा रसिक तयार होणे अधिक कठीण आहे; असाच माझा अनुभव आहे.

आजकालच्या नभोवाणीसारख्या साधनांनी सर्वसाधारण श्रोत्यांच्या कानांवर ‘संगीत’ मोठ्या प्रमाणावर पडत आहे; ही गोष्ट अगदी खरी आहे. परंतु यातील किती श्रोते ‘शास्त्रीय’ नांवाचे संगीत ऐकतात, हा प्रश्न मोठा चिंतनीयच ठरेल. अनेकाना तर हे शास्त्रीय संगीत अनिच्छेने किंवा सक्तीनेच ऐकावे लागते, हा आजच्या व्यवहारातील नित्याचाच अनुभव आहे. असंख्य श्रोत्यांनी पुष्कळ संगीत ऐकले आहे—ऐकत आहेत, केवळ एवढ्याच गोष्टीवरून संगीत लोकाभिमुख झाले आहे, रसिक खूप झाले आहेत, सर्वसामान्यांमध्ये संगीताची ‘जानकारी’ फारच वाढलेली आहे, असे आपण समजू तर प्रामाणिक अर्थाने श्रोत्यांवर केलेला तो एक आरोपच ठरेल ! चावडीमध्ये बसल्या बसल्या भाराभर वृत्तपत्रे वाचून त्यातील कोणत्याही बाबींवर हवी तशी चर्चा करणारे गांवोगांवचे ‘गणपा’ आम्ही ‘ज्ञानदेव’ समजण्यासारखेच हे होणारे आहे. आज ठिकठिकाणी संगीताचे कार्यक्रम, संगीत परिषदा, संगीताचे उत्सव, महोत्सव होत असतात. अशा कार्यक्रमाना बेसुमार गर्दीही होत असते. परंतु हे सारेच रसिक असतात, असे म्हणणे फारच धाष्टर्याचे ठरेल. तब्येत लागेल तेव्हा यावे, वाटेल तेव्हा निघून जावे, वाटेल तसे बसावे, झोपावे, लोळावे अशा परिस्थितीत ऐकल्या जाणाऱ्या कलेचे रसग्रहण कितीसे सार्थ होणार ? मैफलीची काही निश्चित पथ्ये आहेत. ती कलावंत आणि रसिक या दोघांनीही पाळली नाहीत, तर ती मैफल एका अर्थाने ‘एरंडाचे गुऱ्हाळ’च ठरते. अर्थात् अशा गुऱ्हाळातून जी रसनिर्मिति घडते ती खचितच स्वागतार्ह नसते. अशा श्रोत्यांमध्ये समजदारी तर कधीच येत नाही, उलट ते कमालीचे अहंकारी बनतात, असाच माझा अनुभव आहे.

पं. रविशंकरजींचे असामान्य सतारवादन ऐकून आलेल्या एका विदुषीने ‘रविशंकर अगदी चित्रासारखा छाँऽऽन् दिसतो नै ऽऽ ?’ इतक्याच शब्दांत अखिल मैफलीचे रसग्रहण केले. दुसऱ्या एका रसिकाने “तबला वाजवताना सामताप्रसादची बोटंसुद्धा दिसत नाहीत हो ऽ ऽ, त्या मानानं थिरकवाचा हात अगदीच बध्यड वाटतो बुवा !” अशा मोजक्या शब्दांत दोन्ही कलाकारांची वासलात लाविली. कलाकाराला ज्याप्रमाणे मूळचाच कलात्मक पिंड असावा लागतो, त्याचप्रमाणे रसिकतेचाही पिंड जन्मजात लाभावा लागतो. खऱ्या रसिकाचे सर्वात महत्वाचे भांडवल म्हणजे त्याची सहृदयता हेच होय ! व्रणावर चोंच मारणारे तथाकथित रसिक आज आपण हजारो पहातो, परंतु नेमकी मुक्ताफळे भक्षण करणारे रसिक अभावानेच दिसतील. कलावंताचे दोष काढीत बसणे, ही अगदी सुलभ आणि प्राथमिक बाब आहे. त्यांच्यातील गुणवत्ता नेमकी हेरून तो आनंद लुटणे, ही गोष्ट मात्र सहजावारी साध्य होण्यासारखी नसते. या गोष्टीला खऱ्या मार्मिक दृष्टीची आवश्यकता असते. नेमके दोष हुडकून काढणे, ही भूमिका शिक्षकाची आणि गुण शोधून काढणे ही भूमिका खऱ्या रसिकाची !

नुसत्याच बहुश्रुतपणाने खरी रसिकता अंगी येईल असे मुळीच नाही. उत्तमोत्तम कलाकार विशेषतः खासगी मैफलींत ऐकून, प्रथमतः काही दिवस तरी त्यांच्या कलेचे नेमके मर्म तज्ज्ञांकडून विद्यार्थीवृत्तीने समजावून घेण्यानेच कलेची खरी मर्मे हळूहळू समजू लागतील. संगीताची प्रत्यक्ष काही साधना केली म्हणजे सर्व काही मर्म समजले असे मात्र मुळीच नाही ! कारण अरसिक कलाकार मी पुष्कळच पाहिले आहेत.

काव्य, साहित्य यांचा दर्जा आजकाल फारच खालावल्याची तक्रार विचारवंत साहित्यिक करतात. संगीताचे मर्मज्ञही नेमकी हीच तक्रार करतात. आणि ती अगदी सार्थ आहे. जास्ती नाही परंतु गेल्या २५।३० वर्षांचा कालखंड आपण जरा बारकाईने तपासला, तरी आमची मौलिक ‘चीज-वस्तु’ मोठ्या प्रमाणावर नाहीशी झाली आहे, सौंदर्यस्थळे मोठ्या प्रमाणावर भंगली आहेत आणि कलात्मक दीप्ति एकूण फारच कमी झाली आहे, असेच दिसते. याला कारणे बहुविध आहेत. या कलेला पूर्वी राजाश्रय होता, आज ती लोकाश्रयावरच सर्वस्वी अवलंबून आहे. लोकानुरंजनाच्या पाठीमागे लागलेली कला सखोल राहू शकणार नाही. तिच्यात बाळसेही रहाणे अशक्य ! उत्तम गुरुशिवाय ही विद्या साध्य होणे दुरापास्तच. असे गुरु तरी आजकाल किती आहेत ? उत्तर जवळजवळ नकारात्मकच द्यावे लागेल. आपल्या सरकारने यादृष्टीने काही प्रयत्न केलेले होते आणि आजही करीत आहे; परंतु योजनाबद्धतेच्या अभावी ते बरेचसे वाया गेले. मरहूम उस्ताद विलायत हुसेनखां साहेबांसारखी एक थोर व्यक्ति सरकारी—यंत्रणेत काही काळ राबूनही त्यांचा कितीसा उपयोग करून घेतला गेला ? अशी कितीतरी उदाहरणे देता येण्यासारखी आहेत.

आपल्या कित्येक कलाकारांना सरकारने महत्त्वाच्या आणि सन्मानदर्शक पदव्या देऊन गौरविले, तसेच मानधन, मानवेतन व प्रशस्तिपत्रके देऊन कलेचे व कलाकारांचे स्थान उंचावले आहे, याबद्दल सरकारला धन्यवाद देणे जरूर आहे. सरकारचे यावेळचे









अनुक्रमणिका

एक आवश्यक कार्य असे की, जे कोणी क्वचित् घराणेदार 'बुजुर्ग' कलाकार अद्याप सुदैवाने हयात आहेत, त्यांचेकडे हुशार विद्यार्थी तांतडीने सुपूर्त करावेत आणि या विद्येचे अंशतः तरी जतन करावे. या विद्येच्या साधकाला भावी जीवनात स्थैर्य मुळीच लाभत नाही, त्यामुळे कोणी (हुशार आणि कर्तबगार युवक) या क्षेत्रात व्यवसायाचे दृष्टीने पदार्पण करीत नाहीत. हा धोका नाहीसा झाल्याशिवाय या कलेच्या प्रांतात तेजस्वी व्यक्तिमत्व अवतरणार नाही!

भारतातील एका श्रेष्ठ व यशस्वी गायकानेही अन्य व्यावसायिकांच्या हालअपेष्टा पाहून, "आम्ही या व्यवसायात पडलो हेच पुष्कळ झालं, माझ्या मुलाला मी गाण्यापासून अगदी लांब ठेवलंय," असे कटु उद्‌गार काढले. यातील मर्म आणि धोका ही लक्षात ठेवण्यासारखी आहेत.

मी वर सुचविलेल्या गोष्टींचा काही प्रत्यक्ष आचार घडला तरच आमच्या शास्त्रीय संगीताचा तरणोपाय आहे. वेळीच असे काही न घडले, तर एका यदृच्छेवरच भरंवसा !

---

## "तानसेन नाही! निदान 'कानसेन' तरी" — जी. एन. जोशी

**आज** शास्त्रीय संगीत लोकाभिमुख झाले आहे असे मला वाटत नाही. शास्त्रीय संगीत कलाकार मात्र नाइलाजाने लोकाभिमुख झाले आहेत. यातील नव्या पिढीतील उदयोन्मुख कलाकारांनी काळाची पावले ओळखून आपली कला बहुजन समाजाला आकर्षित करता येईल अशा शैलीने नटवून सादर करावयाला सुरुवात केली आहे. जुन्या पठडीतील कलाकार मात्र लोकाभिमुख झाले तरी त्यांचा जुना पीळ अद्याप कायम असल्याने ते आपल्या कलादर्शनाच्या बाबतीत तडजोड करण्यास तयार नाहीत. त्यामुळे त्यांच्याभोवती निर्माण झालेल्या कीर्तिवलयाने आकर्षित होऊन जे श्रोते त्यांच्या मैफलींना येतात ते बहुतेक निराशा पदरी घेऊन परत जातात. संगीताचे खाजगी व सरकारी सप्ताह याना उपस्थित रहाणारा श्रोतृवर्ग 'असंख्य' असतो हे विधान चुकीचे आहे. अशी गर्दी फक्त मुंबई, पुणे, नागपूर, कलकत्ता आदि मोठ्या शहरातूनच होते व तीही वर म्हटल्याप्रमाणे ज्यांच्याभोवती जागतिक कीर्तीचे वलय आहे त्यांच्या मैफलीना. बाकीच्या सर्व लहान मोठ्या शहरी, जिल्ह्याच्या गावी शास्त्रीय संगीताचे कार्यक्रम प्रथम श्रेणीच्या कलावंतांचे अगदी माफक दरात सादर केले असतानाही श्रोते आकर्षित होत नाहीत. हा कटु अनुभव महाराष्ट्र सरकारतर्फे आयोजित होत असलेल्या संगीतमहोत्सवातील अनेक वर्षांचा आहे. सरकारदप्तरी नोंदलेल्या या कार्यक्रमाना झालेले उत्पन्न जर गमक मानले तर माझ्या उपर्युक्त विधानाची सत्यता पटेल.

शास्त्रीय संगीत लोकाभिमुख झाल्याने त्याची पातळी खालावेल असे मला वाटत नाही. पातळी खाली नेणे वा (उच्च आहे असं धरून चालल्यास) कायम ठेवणे याची जबाबदारी कलावंतांवर आहे. आपल्या कलेची मांडणी, पातळी कायम ठेऊन, लोकाना रुचेल व पचेल अशा आकर्षक स्वरुपात मांडण्याचा प्रयत्न नवोदित कलाकार करीत आहेत. तसे करताना त्यांनी जर काही नवे प्रयोग केले तर त्यामुळे पातळी खाली येत आहे, अशी उगीच हाकाटी करण्यात अर्थ नाही. शास्त्रीय संगीताला इतकी वर्षे पाठ फिरवून बसलेला बहुजन समाज पुन्हा आकर्षित करून घेताना त्या समाजाला खालच्या पातळीवरून वरच्या पातळीवर आणावयाचे आहे. त्याकरता त्यांना वरती येण्यास सुलभ असा दुवा नसला तर या दोन पातळ्यांचा समन्वय कसा साधणार ? कलाकारांनी अभिजात संगीताचे स्वरुप न बिघडविता या श्रोत्यांना बोट धरून वरती आणण्याचा प्रयत्न जर केला तर पातळी खाली येणार नाही. उलट बहुजन समाज शास्त्रीय संगीताभिमुख होऊन श्रोत्यांची रसग्रहणाची पातळी उंचावेल.

यासाठी जुन्या जमान्यात मान्य झालेल्या समजुती व रूढी यांना बदलत्या काळानुसार मुरड घालून सद्य स्थितीला योग्य व पोषक ठरेल अशा रीतीने आपली कला लोकमान्य करण्यासाठी आकर्षक स्वरुपात मांडण्याचे महत्त्व व जरुरी शास्त्रीय कलाकारांनी जर ओळखली तर हे होणे कठीण नाही. आपले शास्त्रीय संगीत हे स्वरप्रधान आहे त्यात शब्दांना बिलकुल स्थान नाही—शब्द हे केवळ स्वरांना खुंटाळी म्हणूनच त्यांचा उपयोग आहे, या रूढ झालेल्या (गैर) समजाबाबत फेरविचार करण्याची वेळ आली आहे. रागदारीतील चिजांची बंदीश करणारे जुने रचनाकार सदारंग, अदारंग, मनरंग, प्रेमपिया, प्राणपिया, तसेच अलीकडच्या जमान्यातील सबरंग, गुनीदास वगैरे रचनाकार यानी रागाचे स्वरूप, प्रकृति व सादर करण्याची वेळ या सर्व गोष्टी लक्षात घेऊनच चीजा बांधलेल्या आहेत. तेव्हा अशा चीजा या सर्व गोष्टींबद्दल जागरुक राहून, त्या संपूर्ण स्पष्टपणे सादर करताना, त्यातील अर्थानुसार भावाविष्कार करण्याचा प्रयत्न केला, तर हे पुष्कळ अंशी सफल होणार आहे. नाहीतर 'बारा बरस गये, पिया नही आये' या एका चीजेतील शब्दांऐवजी 'बारा एके बारा, बारा दुणे चोवीस' अशी बाराखडी स्वरांना खुंटाळे म्हणून जर गायकाने उपयोजिली तर श्रोत्यांची करमणूक (?) होईल पण गायकांचे काय होईल—अथवा काय होते हे आतापर्यंतच्या अनुभवाने दिसून आले आहे. तेव्हा आताही जर हे दुराग्रही मत बाजूला सारून, वस्तुस्थितीला तोंड देण्यासाठी व योग्य ते उद्दिष्ट साध्य करण्यासाठी, कलाकारानी आपली मांडणी आकर्षक स्वरूपात सादर करण्याचा प्रयत्न केला नाही, तर विन्मुख श्रोते अभिमुख होण्याऐवजी अधिक लांब व दूर रहाणेच जास्त पसंत करतील. शास्त्रीय संगीत हे बहुजन समाजासाठी मुळी नाहीच ते केवळ जाणत्या व उच्च अभिरुचीच्या श्रोत्यां-

साठीच आहे असा दावा करणाऱ्यांनी, कलाकारांना आता केवळ लोकाश्रयावरच अवलंबून रहावयाचे आहे या गोष्टीचीही नोंद घेतली पाहिजे.

मैफलीना जमणारे बहुसंख्य श्रोते (मुंबईतील काही संगीत-वर्तुळांचे सभासद वगळता) संगीताच्या बाबतीत अनभिज्ञ असतात. पुष्कळसे केवळ फॅशन व ऐपत आहे तिचा देखावा करण्यासाठी येतात व गर्दी करतात. बाकीच्यांतीलही अर्धेअधिक थोडेफार जुजबी ज्ञान असलेले—पण अर्धवट रसिक असे व राहिलेले अगदीच थोडे खरे जाणते असे असतात. श्रोत्यांची रसग्रहणाची कुवत काय आहे हे अचुक हेरण्याचे कसब कलाकाराजवळ जर असेल, तर त्याप्रमाणे आपल्या कलेच्या प्रदर्शनाची आखणी करून तो मैफिल जिंकील. नाहीतर जी काही शेलकी दर्दी मंडळी असतात, त्यांच्या दाद देण्यावरच कलाकाराला समाधान मानून घ्यावे लागते.

रसिक श्रोता बनण्यासाठी काही 'खास' शिक्षण देणे शक्य नाही. संगीताबद्दल विशेष आवड ही निसर्गतःच पाहिजे. त्यानंतर त्या आवडीवर योग्य ते संस्कार बालवयापासून झाले, तर रसिक-कान तयार होतात. संगीतशास्त्राचे अध्ययन या दृष्टीने फार महत्त्वाचे आहे. ताल, लय व स्वर यांचे आकलन उत्तम झाले तर व कसबी कलावंतांच्या मैफिली वारंवार ऐकण्याची संधी मिळाली, तर दर्दी रसिकता आपोआपच बाणली जाते. हल्ली संगीताचे शिक्षण फारच सवंग व सुलभ झाले आहे. विशारद, रत्न, अलंकार, कोविद, यासारख्या पदव्या मिळवून अनेक श्रीयुत व श्रीमती कलाक्षेत्रात वावरत आहेत. पण त्यातून सच्चे कलाकार फारच थोडे निपजतात. संगीताचे व्याकरण जाणणारे काही तयार होतात, पण कलावंत तयार होत नाहीत ही खेदाची गोष्ट आहे. या अशा शिक्षण संस्थांतून 'तानसेन' तयार होतील अशी अपेक्षा नाही. पण त्यातून निदान चांगले 'कानसेन' तयार व्हावेत अशी अपेक्षा आहे. व हे कानसेनच रसिक श्रोते म्हणून कलावंताला दाद योग्य तेथे देतील व प्रोत्साहित करतील.

## "तूर्त संगीत हे मन्वंतराच्या कालात आहे" —डॉ. एम. डी. फळणीकर

**संगीताच्या** एक विद्यार्थी आणि रसिक श्रोता या दृष्टीकोनातून आपण विचारलेल्या प्रश्नांची उत्तरे यथामति देण्याचा प्रयत्न करीत आहे.

आपल्या १ ल्या प्रश्नाचे उत्तर :—

शास्त्रीय संगीत लोकाभिमुख निश्चितच झाले आहे, असे अनुभवाला येते.

प्रश्न दोनचे उत्तर :—

संगीत लोकाभिमुख आणि लोकप्रिय झाल्यामुळे त्याची पातळी खालावली आहे, असे मला वाटत नाही. पण सध्या संगीत हे मन्वंतराच्या कालात असल्यामुळे व संगीत कलाकारांची लोकप्रियता सवंग झाली असल्यामुळे संगीताच्या पातळीवर या घटनेचा परिणाम पातळी खालावत जाण्याकडे होत जाईल, असे मला वाटते.

प्रश्न तीनचे उत्तर :—

संगीताची पातळी उच्च प्रतीची कायम राखण्याकरिता अनेक तऱ्हेचे प्रयत्न दीर्घ कालपर्यंत करावे लागतील.

(अ) किशोरावस्थेतील मुलामुलींत संगीताची आवड उत्पन्न होऊन शास्त्रीय संगीताविषयी प्राथमिक ज्ञान उपलब्ध करून देण्याकरिता शिक्षण संस्थांमधून अधिक जोराचे प्रयत्न करावे लागतील. गेल्या काही वर्षांपासून एम. एम्. सी. परीक्षेकरिता संगीत हा ऐच्छिक विषय घेऊन विद्यार्थी बसतात. परंतु संगीत विषय घेणाऱ्याची एकंदर संख्या फारच अल्प असते. कारण महाविद्यालयाच्या अभ्यासक्रमात संगीताचा अंतर्भाव झालेला नाही. महाविद्यालयीन अभ्यासक्रमात सर्वत्र संगीताचा अंतर्भाव करण्याबद्दल जोराची खटपट झाली पाहिजे. नियत अभ्यासक्रमात संगीत विषयाला योग्य ते स्थान मिळाल्यामुळे अधिकाधिक विद्यार्थ्यांची प्रवृत्ति संगीताचा अभ्यास करण्याकडे होईल, शास्त्रीय संगीताच्या श्रोत्यांचा एक चोखंदळ वर्ग निर्माण होईल आणि यातील काही विद्यार्थी आपली स्वतःची संगीतातील प्रगति अधिकाधिक करून घेऊन अधिक संगीत कलाकार होतील.

(ब) शास्त्रीय संगीतात परीक्षा घेऊन प्रतवारी ठरवून, जी पाठ्यवेतने देण्यात येतात त्यांची संख्या हल्लीपेक्षा वाढली पाहिजे. शास्त्रीय संगीतातील निरनिराळ्या घराण्यांच्या विद्यमान अधिकारी स्त्रीपुरुषांना, अनुभवी संगीत शिक्षकांना आणि संगीतावर प्रदीर्घ वाचन आणि मनन केलेल्या अभ्यासकांना एकत्र जमवून किंवा प्रश्नपत्रिकांद्वारे या सर्वांची मते संकलित करून संगीताचे एक Minimum Standard of competency in theoretical and Practical Music असा संगीताचा अभ्यासक्रम आणि त्याबद्दलचे प्रमाणपत्र हे निर्माण केले पाहिजे. संगीतात प्रवेश करून पुढे जाऊ इच्छिणाऱ्या आणि भावी कलाकार होण्याची मनीषा बाळगणाऱ्या कलाकारांनी हे प्रमाणपत्र हस्तगत केलेच पाहिजे अशी सक्तीची अट असल्याशिवाय संगीताची पातळी उच्च ठेवणे कठीण होईल.

प्रश्न चारचे उत्तर :—

श्रोत्यांच्या रसिकतेचा भर बहुतांशी स्वरांच्या गोडव्यावर अवलंबून असतो असे दिसते. कर्णमधूर संगीत हेच श्रोते पसंत करतात. क्लिष्ट संगीत आणि शास्त्रीय असूनहि अगोड संगीत सर्वसाधारण श्रोत्यांना आवडत नाही असे दिसते. त्यातील शास्त्रीय भाग काहीच

समजत नसल्यामुळे श्रोत्यांच्या डोक्यावरून जातो. संगीत सुरेल नसेल तर त्याला श्रोत्यांकडून दाद मिळाली नाही तर त्याचा दोष श्रोत्यावर लादता येणार नाही.

प्रश्न नं. ३ च्या ब उत्तरात माझ्या श्रोत्यांच्या किमान अपेक्षांचे उत्तर आले आहे.

प्रश्न पांचचे उत्तर :–

सर्वच संम्मेलने अधिकाधिक संगीत श्रोते निर्माण करण्याचे एक अत्यंत उपयोगी कार्य करतात असे मला वाटते. श्रोतृवर्गाची रसिकतेची पातळी वाढवणे हे कार्य संमेलनाच्या कक्षेबाहेरचे आहे. परंतु काही वार्षिक संमेलनांनी अशी उच्च पातळी निर्माण करून ठेवली आहे की नवनवीन श्रोते त्या संमेलनाला हजर राहाण्याची इच्छा मनात बाळगतात आणि उत्तोमोत्तम संगीत ऐकण्याची आपली मनीषा पूर्ण करतात. सर्वच संमेलने यशस्वी होणे हे शक्य नाही.

प्रश्न सहाचे उत्तर :–

संमेलनाचे साध्य यशस्वी व्हावयाचे असेल तर दर्जेदार, चोखंदळ श्रोतृवर्ग निर्माण झाला पाहिजे. अशा श्रोतृवर्गाची पातळी प्रश्न ३ व मध्ये दर्शवलेली आहे.

प्रश्न ७ चे उत्तर प्रश्न नं. ३ मध्ये आलेले आहे.

प्रश्न आठचे उत्तर प्रश्न नं. २ मध्ये आले आहे.

संगीत या संस्कृति–निदर्शक विषयाच्या या लोकहित साधणाऱ्या चर्चेला आपण चालना देत आहात याबद्दल आपले अभिनंदन करतो आणि आपले आभार मानतो.

---

# "श्रोता हा संगीत शिकलेला हवा" – माधवराव भागवत

**आज** चा जमाना सामान्यपणे सिनेसंगीताचा मानला जातो. असे असूनहि एकेकाळी ठराविक वर्तुळाच्या कक्षेबाहेर न येणारे शास्त्रीय संगीत सिनेसंगीताप्रमाणे आज समाजात वावरू लागले आहे. शास्त्रीय संगीताविषयी लोकांना अधिकाधिक आवड निर्माण होऊ लागली आहे. त्यामुळे नटभैरव, पूर्वाकल्याण यांसारखे रागहि सहजी ओळखले जातात. राग अतिशय सोप्या आणि अनलंकृत स्वरूपात लोकांसमोर येत असल्याने लोकाभिमुख शास्त्रीय संगीताचा दर्जा मात्र असावा तेवढा उंच राहिलेला नाही. बहुतेक गवई मिश्र व अनवट राग गाण्याच्या भरीस पडतात. शुद्ध राग गातो तो गवईच नव्हे, असाहि एक सूर ऐकू येतो. लोकप्रियतेच्या लालसेमुळे संगीताचा दर्जा खालावला जातो, असे म्हणण्यास हरकत नाही.

संगीताची घसरणारी पातळी वर आणण्यासाठी सुसूत्र प्रयत्न झाले पाहिजेत. संगीत शिक्षणाची पद्धति सुनिश्चित् स्वरूपाची असली पाहिजे. उदाहरणार्थ, एकदम जोगकंस शिकविण्यापेक्षा, मालकंस, चन्द्रकंस, जोगकंस अशा पायरीने शिक्षण देणे उत्तम होय. अलिकडच्या गाणाऱ्यांना साधा तोडी स्वच्छ गाता येत नाही आणि एकदम खटतोडीला हात घालतात. इथेच गाणे फसते.

संगीताचा दर्जा सुधारणे केवळ गवयांच्या आणि काही अंशी श्रोत्यांच्याच हाती आहे. सरकारी किंवा बिनसरकारी संस्थाना याबाबततीत काहीहि करणे अशक्य आहे.

संगीताच्या मैफलींना जमणाऱ्या श्रोतृवृंदाकडून किमान अपेक्षा अशी की योग्य ठिकाणी दाद देता यावी इतके स्वर, ताल, लय यांचे ज्ञान व भरपूर रसिकता श्रोत्यांजवळ असावी. Fashionable interest म्हणून शास्त्रीय संगीताच्या मैफलींना येणारे आणि कलावंताच्या पुढ्यात बसून 'वाह ऽ वा !, क्या बात है' वगैरेंचा नको तेव्हा, नको तितका पाऊस पाडणारे अनेक लोक हल्ली आढळतात. एकदा विर्लो मातुश्री सभागारात खाँसाहेब विलायतखाँच्या सतारीचा कार्यक्रम होता. कार्यक्रम सुरू झाल्यानंतर काही वेळाने खाँसाहेबानी माईकवरून सांगितले की, "मागच्या (५–६ व्या) रांगेतील माणसे जरा पुढे आणून बसवा. त्यांना संगीत कळते आहे. पहिल्या रांगतील लोकांनी नको तेथे दाद देऊन माझा मूड खराब केला आहे." खाँसाहेब स्पष्टवक्ते, म्हणून ते बोलू शकले. इतर कलावंतांनाहि असा अनुभव येत असेल.

संगीत ऐकणाऱ्यांमध्ये आणखी एक अनिष्ट गोष्ट दिसून येते. ती म्हणजे गटबाजी. विशिष्ट गवयाचेच गाणे ऐकणारा एकेक कंपू असतो. मग त्या गवयाच्या चुकांचे देखील तो कंपू समर्थन करतो. त्या कलावंताने 'शंकरा' सांगून 'हंसध्वनी' गाईला, तरीहि हा कंपू 'वाहवा'चे फवारे सोडतो. त्यामुळे बऱ्याच लोकांची दिशाभूल होते. ठिकठिकाणी भरणाऱ्या संमेलनांतून वरील गोष्टी दिसून येतात. सूर न् सूर समजून चाखत, चोखत ऐकणाऱ्या जाणत्याला अशा विचित्र श्रोत्यांचा त्रासच होतो. सतारीसारखे तंतुवाद्य छेडतांना, समेवर येताना, अति द्रुत लयीत तिहाई घेऊन सम चुकीच्या मात्रेवर गाठली तरी टाळ्यांचा कडकडाट झालेला ऐकून जाणता श्रोता स्वतःशी चुकचुकत पुढे ऐकत राहतो.

हे सारे बंद होऊन रसिक श्रोत्यांविषयी असलेल्या अपेक्षा पूर्ण होण्यासाठी श्रोता हा संगीत शिकलेला हवा. आणि धिटाईने त्याने संगीतकाराला मैफलीनंतर का होईना पण छेडले पाहिजे. यासाठी किमान समज येण्याकरिता शाळांतून सक्तीचे संगीत शिक्षण सुरू केले पाहिजे. अर्थात् संगीताविषयी द्वेष उत्पन्न न होता शिक्षण कसे द्यावयाचे हा वेगळा मुद्दा आहे.

☆☆

अनुक्रमणिका

# संगीत 'ऐकणे' हा एक उपाय

## —पं. भीमसेन जोशी

प्र. १ व २ : आजचे शास्त्रीय संगीत हे लोकप्रिय झाले असूनहि त्याची पातळी खालावली आहे असे मला वाटत नाही. कारण संगीताची पातळी ही लोकप्रियतेवर आधारलेली नसून संगीत-कारांवर अवलंबून आहे. आणि आजचे संगीतकार हे स्वतःशी प्रामाणिकपणे जोपर्यंत गात आहेत, तोपर्यंत संगीताची पातळी खालावण्याचे कारण नाही.

प्र. ३ : हा प्रश्न उद्भवतच नाही.

प्र. ४ व ५ : श्रोतृवृंदाबद्दल एक गायक म्हणून माझ्या किमान अपेक्षा खालीलप्रमाणे आहेत. मैफल रंगदार करण्यासाठी गायकाप्रमाणेच तेरसिकश्रो हेहि आवश्यक आहेत. कूड श्रोत्यांसमोर गाण्याचा प्रसंग वैऱ्यावरहि येऊ नये. आज ठिकठिकाणी भरणाऱ्या संमेलनांतून अनेक प्रकारचे श्रोते आढळून येतात. काही लोक गंमत म्हणून आलेले असतात तर काही फॅशन म्हणून. काही लोक केवळ वेळ घालवायलाहि आलेले असतात. मात्र प्रत्येक संमेलनातून खाजगी मैफलींतून गाण्यावर लुब्ध झालेली, संगीतावर प्रेम करणारी आणि जाणकार रसिक मंडळीहि भेटतात. योग्य जागी दाद देणारी काही खास फरकाने, वेगळ्या अंगाने चीज म्हटली की वाहवा देणारी ही मंडळी असली की गाणे अधिक रंगते. रसिक श्रोता हा संगीतातील इतर काही विशेष शिकला नसला तरी सूरांची समज असलेला मात्र जरुर हवा. संमेलने ही मोठ्या प्रमाणावर, अधिक संख्येने असलेल्या श्रोत्यांसाठी असल्याने तिथे सर्वार्थाने अपेक्षा पूर्ण होतातच असे नाही.

प्र. ६ व ७ : रसिकता ही जन्मतात असते ती शिकवून येत नाही. खूप ऐकावे, सर्व प्रकारचे संगीत ऐकावे म्हणजे कान तयार होईल. संगीत शिकलेला माणूस हा नेहमी रसिक श्रोता असेलच असे नाही. पढिक विद्वान रुक्ष श्रोतेच बनतात. त्यामुळे सर्व लोकांचे विविध प्रकारचे संगीत ऐकणे हा एक उपाय आहे. ●●●

[ पृष्ठ ५१ वरून – स्मृति – गान ]

एके दिवशी अशी संगीत सभा चालू असताना मिस्टर व मिसेस शास्त्री येऊन धडकल्या. आमची इंडियन स्टाईल बैठक तर मि. शास्त्री सुटात आणि मिसेस शास्त्री लांब झग्यात आलेल्या. हॉल तर पूर्ण भरलेला. त्याना कुठे बसवावयाचे हे मी मनात योजितो न योजितो तोच, त्या दोघानी आपले चेस्टर्स काढून दरवाजातल्या पायरीवरच आसन ठोकले. मी त्याना खुणावून पुढे येण्याविषयी संकेत केला. पण आम्ही येथेच ठीक आहोत, असे त्यानी मला संकेतानी सुचविले. व ती उभयता दोन तासपर्यंत भारतीय संगीत ऐकत तेथेच ठाण मांडून बसली. पुढे अधून मधून त्या बाईनीपण एक दोन वेळा आमच्या संस्थेत सितारचा कार्यक्रम सुंदर रीतीने साजरा केला. त्या मजजवळ सुमारे दीडवर्ष तरी शिकत होत्या. मग ते जोडपे दिल्लीस राहण्यासाठी गेले.

श्री. पी. के. शास्त्री (प्रकाश कुमार) यांचे वडील कलकत्ता युनिव्हर्सिटीत संस्कृतचे प्रमुख प्राचार्य होते; श्री. प्रकाश कुमार लाहोरला बॅरिस्टर व प्रोफेसर म्हणून काम करीत असत. नंतर ते ऑल इंडिया रेडियो दिल्ली येथे प्रोग्रॅम प्लॅनिंग डायरेक्टर होते. त्याच जागेसाठी ते लाहोर सोडून दिल्लीस गेले होते. दिल्लीला सुद्धा सौ. शास्त्री यानी संगीताचा अभ्यास चालू ठेवल्याचे पत्रातून कळविले होते. त्यानंतर मात्र त्यांची माझी भेट नाही. त्यामुळे त्या भारतामध्ये आहेत की परदेशी निघून गेल्या हे कळण्यास मार्ग नाही.

[ क्रमशः ]

[ पृष्ठ ४७ वरून — घरबसल्या... ]

**अकरा तासांची संगीत सभा**

या अर्ध्या तासात आपली संपूर्ण तयारी दाखविण्याचा वाव कलावंताला मिळू लागला. सरोदिये अलिअकबर, सतारिये रविशंकर सतारिये विलायत खां साहेब, तबलिये अल्लारखा खां, गवय्ये अमीर खां इंदौरवाले, श्रीमती ज्योत्स्ना भोळे इत्यादि लोकप्रिय गायक वादकांचे कौशल्य या मोठ्या ध्वनिमुद्रिकात संपूर्णपणे दिसते. याशिवाय दुसऱ्या पिढीतील ज्या गायक गायिकांच्या तीन मिनिटे पांच सेकंद चालणाऱ्या ध्वनिमुद्रिका अधिक लोकप्रिय होत्या त्यांच्या पाचा पाचाचा एक गट करून त्याना मोठ्या ध्वनिमुद्रिकात एकत्रित करण्यात आले. त्यामुळे आता पुन्हा पुन्हा चावीची दांडी फिरवा, सुया बदला, वारंवार एक संपली की दुसरी लावण्याकरिता जागरूक रहा अशी कटकट राहिली नाही. ध्वनियंत्रातही आता इतकी सुधारणा झालेली आहे की नुसत्या हव्या त्या ध्वनिमुद्रिका एका विशिष्ट जागी अडकवून आपण स्वस्थ बसावे. मधल्या सर्व क्रिया आपोआप होतात.

आता चौथ्या पिढीतील लोकप्रिय गायक गायिकांचे अर्ध्या अर्ध्या तासाचे ध्वनिमुद्रण होऊ लागले आहे. पं. भीमसेन जोशी, श्रीमती माणिक वर्मा, श्रीमती किशोरी आमोणकर, पं. जसराज इत्यादींची शास्त्रीय संगीताची ध्वनिमुद्रणे झालेली आहेत व त्याना खूपच लोकप्रियता मिळू लागलेली आहे. बडे गुलाम अली खां साहेब, अमीर खां साहेब, पं. रविशंकर, अलिअकबर, विलायत खां, पं. भीमसेन जोशी, श्रीमती माणिक वर्मा, किशोरी आमोणकर, पं. जसराज यांच्या नऊ मोठ्या ध्वनिमुद्रिका म्हणजे घरबसल्या वाटेल त्या दिवशी आणि वाटेल त्या वेळी दहा अकरा तासांची संगीत सभा संगीत शौकिनाना ऐकायची सोय झाली.

श्रीमती माणिक वर्मा यांची स्वतंत्र प्रतिभाशक्ति त्यांच्या 'भटियार' व 'जोगकंस' या दोन्ही रागात दिसते. स्पष्ट मोहक शब्दोच्चार, दाणेदार तान-पलटे, अलंकारांचा रसपरिपोषाकडे योग्य उपयोग करण्याची हातोटी, शांत श्रवणीय आलाप या गोष्टी त्यांच्या या ध्वनिमुद्रिकेत आढळून येतात. जोगकंस त्यानी अतिशय तयारीने गायलेला आहे. पं. जगन्नाथबुवा पुरोहित यानी रचलेल्या ख्याल व द्रुत मधील दोन्ही चिजा उत्तम आहेत. ख्यातनाम व्हायोलिन वादक श्री. व्ही. जी. जोग यानी माणिकबाईना हौसेने साथ केली असल्याने या ध्वनिमुद्रिकेला एक वेगळे रूप प्राप्त झालेले आहे व ते वैशिष्ट्यपूर्णही आहे. ●●●



**इतर कलांप्रमाणेच संगीतकलेच्या प्रगतिसाठी पूर्वग्रह विरहित, कलात्मक सौंदर्याच्या निकषावरच कलावंताचे मूल्य जोखले पाहिजे, असा काळ आता निर्माण झाला आहे. या अनुषंगाने श्री. वि. रा. आठवले यानी मांडलेले काही विचार....**

# संगीतातील परंपरावाद

**एकदा** एका ख्यातनाम कलावंताच्या गाण्याच्या बैठकीला गेलो होतो. अमुक घराण्याचे आणि अमुक गुरुंचे शिष्य म्हणून गवईबुवांची खूपच प्रसिद्धी होती. गाण्याला संगीताची व्यवसायी मंडळी, जाणते दर्दी रसिक आणि कलावंताच्या नांवाबद्दल कुतूहल असणारे अनेक संगीत-प्रेमी हजर होते. सुरुवातीला गायकाचा परिचय करून देण्यात आला. त्या प्रशंसेतील बराचसा भाग खुद्द बुवांच्या व्यक्तिगत गुणांपेक्षा त ज्या घराण्यातील गायक म्हणून प्रसिद्ध होते, त्या घराण्याच्या महत्तेबद्दल होती. बुवांचे घराणे किती उच्च आहे आणि परंपरा कशी खानदानी आहे याचे वर्णन झाले. बुवांच्या गुरुजीं-विषयी सांगितले गेले आणि आपल्या गुरुजींचे गाणे बुवा कसे टिकवून आहेत याबद्दल तारीफ केली गेली. बुवांचे गाणे सुरू झाले. संगीतातल्या ठेकेदार रसिक मंडळीनी 'वाहवा' 'बहोत अच्छा' म्हणून दाद दिली. मैफिलीला गायक वर्गापैकी जे उपस्थित होते, त्यानी एकमेकाकडे संमतिदर्शक मुद्रेने पाहून 'आहे, रीत आहे, घराण्याची तालीम आहे, गुरुंचे गाणे हुबेहूब गात आहे' असे उद्गार काढून गाण्याबद्दल पसंती दर्शविली.

या जाणत्या मंडळीच्या चेहऱ्याकडे पाहून इतर संगीतप्रेमी मंडळींनी गाणे चांगल्या दर्जाचे असले पाहिजे असा कयास बांधून मैफिलीच्या रंगतीला आपलीही साथ दिली. थोडक्यात म्हणजे त्या दिवशीची बुवांची मैफिल चांगली रंगली. श्रोत्यांचा रंग ओळखून बुवांनीही थोडी नम्रता दाखवून "आम्ही आपलं आमच्या घराण्याचं वळण गिरवतो आहे; बाकी गाना बिना हम क्या जाने? अपने उस्तादकी तालीम गा रहा हूं" असे सांगून श्रोत्यांना आपल्या उच्च परंपरेची जाणीव करून दिली. रंगलेल्या त्या मैफिलीत मीही एक श्रोता होतो. त्या दिवशी थोडयाशा तटस्थ वृत्तीने, गर्दीच्या या मानसशास्त्रात सामील न होता, गायकाच्या गाण्याची मजा स्वतंत्रपणे घेण्याच्या दृष्टीने मी गाणे ऐकत होतो. आणि ते गाणे ऐकल्यावर त्या मैफिलीचा जो एकंदर परिणाम माझ्यावर झाला आणि त्यातून माझ्यापुढे संगीतविषयक एक प्रश्न उत्पन्न झाला. तो समानधर्मी लोकांपुढे चर्चेसाठी मांडत आहे.

या अशा मैफिली मी अनेक वर्षे अनेक ठिकाणी ऐकत आलो आहे. गायकांच्या गुणावगुणांची चर्चा अनेक रसिक मित्र व गायक मंडळींच्या बरोबर केली आहे. गाण्याच्या मैफिलीत गायकाच्या कला-सौंदर्याचा आस्वाद घेण्याचा तो समजावून घेण्याचा प्रयत्न केला आहे. गाण्यातील मर्मस्थळे कोणती यांचा शोध घेण्या-करता जिज्ञासूपण खुद्द कलावंताबरोबर चर्चा केली आहे. आणि या सर्व प्रयत्नां-मधून मला असे आढळून आले आहे की, आपल्या कलेत सौंदर्याचा आविष्कार करणारी बहुसंख्य कलावंत मंडळी आणि त्या कलासौंदर्याचा आस्वाद घेणारी बहुतेक रसिक मंडळी ही कोणत्या तरी विशिष्ट प्रणालीच्या सौंदर्य कल्पनेने बांधलेली आहेत. आणि त्या दृष्टीने कला-सौंदर्याचे मूल्यमापन चालले आहे. मला पडलेला प्रश्न असा की, पारंपरिक कल्पनेतून मुक्त होऊन कलावंताला आपला कलाविष्कार करणे इष्ट आहे की नाही आणि कलासौंदर्याचा आस्वाद घेणाऱ्या रसिकमंडळींनासुद्धा अशा तऱ्हेने पूर्व-ग्रहापासून मुक्त होऊन कलेचे रसग्रहण करणे शक्य आणि इष्ट आहे की नाही? संगीत क्षेत्रात अशा तऱ्हेची विचारसरणी निर्माण झाली तर कलेचे सौंदर्य वाढ-वण्यास आणि कलेचा विकास साधण्यास पोषक ठरेल; कां त्या योगाने काही अधिक अव्यवस्था वाढून कलेची हानी होईल. हा माझ्या पहिल्या प्रश्नाच्या अनुषंगाने निर्माण होणारा दुसरा प्रश्न आहे.

## संगीतातील परंपरेचे महत्त्व

संगीत क्षेत्रातल्या कलावंताकडे जर आपण दृष्टी टाकली तर आपल्याला असे दिसेल की, आज शेकडो वर्षे ही कला गुरु-परंपरेने एका कलावंताकडून दुसऱ्याकडे अशा तऱ्हेने चालत आली आहे. साहजिकच गुरुने जे शिकवले, सांगितले, त्या-प्रमाणे हुबेहूब अनुकरण करून आपल्या





अनुक्रमणिका

गायकीची मांडणी करणे हे कलावंताचे साध्य झाले आहे. आणि गुरुच्या शिकवणी-प्रमाणे त्याची सौंदर्यदृष्टी घडली गेली आहे. गुरुने शिकवलेली गायकी सच्चे-पणाने मी गातो असा अभिमान गायका-मध्ये निर्माण झाला आहे आणि आपला शिष्य आपले अनुकरण हुबेहूब करतो असा अहंकार गुरुच्या ठिकाणी निर्माण झाला आहे. अहंकार म्हणण्याचे कारण की, जेव्हा एखाद्या शिष्याने स्वतंत्र बुद्धीने सौंदर्याची मांडणी करण्याचा प्रयत्न केला आहे, त्यावेळी गुरुने त्याला अव्हेरले आहे, त्याची नालस्ती केली आहे, आणि त्याच्याशी आपला संबंध सोडला आहे. गायक कलावंत हा आपल्या स्वतःच्या सौंदर्य कल्पनेशी किती प्रामा-णिक आहे आणि किती प्रामाणिकपणे सौंदर्यविष्कार करतो आहे यापेक्षा तो आपल्या घराण्याच्या गायकीला किती प्रामाणिक आहे आणि आपल्या गुरुंशी कितपत इमान राखून आहे, या गोष्टीला महत्त्व आले आहे. आणि तो प्रमुख संगीत गुण ठरला आहे. सुरेल, स्वच्छ आणि भावपूर्ण गाणे ऐकल्यावर आणि ते मनाला पटले तरी त्याचा दर्जा ठरविण्याबाबत, त्याच्या गाण्यामध्ये काही घराणे दिसते की नाही याला अकारण महत्त्व दिले जात आहे. हे मी काल्पनिक सांगत नाही. एकदा एका नवो-दित गायिकेचे गाणे ऐकले. सुंदर गाणे झाले. पण माझ्या एका रसिक मित्राबरो-बर बोलता, तो म्हणाला "चांगली गाते ती, पण काय हो! तिच्या गुरुचे गाणं यात कुठे दिसते? आणि अमुक घराण्याची ती गायिका म्हणविते पण त्यातले तर काही हिच्या गाण्यात दिसत नाही." गोष्ट खरी होती पण मी म्हटले की गाणे चांगले वाटले ना? मग तिच्या घराण्याशी, गुरुशी तुम्हाला काय करा-यचे आहे? ती आपल्या सौंदर्यकल्पनेला प्रामाणिक राहून गायकीची मांडणी करीत आहे ना? आणि ती तुम्हाला आवडते आहे ना? मग परंपरेची चर्चा कशाला? गाण्याची चर्चा करतांना अशा तऱ्हेचे उद्‌गार अनेक वेळा ऐकायला मिळाले आहेत. आणि गंमतीचा भाग असा की, रसिक श्रोता जसा एका विशिष्ट परं-परेने बांधला गेला आहे आणि त्याच दृष्टीने कलास्वाद घेत आहे. त्याप्रमाणे कलावंत पण या पारंपारिक कल्पनेतून मुक्त नाही. मी अमुक घराण्याचा अमुक गुरुचा शिष्य असे सांगण्यात त्याला अभिमान वाटतो. मग भले तो त्या गाय-कीशी प्रामाणिक असो वा नसो. आणि गुरुजींची तर गोष्टच काय विचा-रायची? शिष्य आपली सौंदर्य कल्पना घेऊन गायकी गात आहे की नाही, यापेक्षा तो आपले नांव लावतो आहे आणि आपल्या घराण्याचा शागीर्द म्हणवतो आहे यातच गुरुजी खूष. आता काही काही कर्मठ गुरुजीना आपण दिलेली तालीम शिष्य गात नाही, याचा विषाद वाटून ते रागवल्याची उदाहरणे पाहावयास मिळतात ही गोष्ट वेगळी. उदाहरणार्थ स्व. अल्लादियाखां आपल्या चिरंजीवावर म्हणजे मंजीखांसाहेबावर नाराज होते, कारण मंजीखां आपल्या घराण्याव्यतिरिक्त दुसऱ्या घराण्याच्या सौंदर्य कल्पनांचा आपल्या गायकीत आविष्कार करत असत. आणि यात मौज अशी की आपल्या मुलावर अशा तऱ्हेने रुष्ट असणाऱ्या या थोर कलावंताने स्वतःच्या प्रतिभेने स्वतःची अशी विशिष्ट सौंदर्यप्रणाली निर्माण केली होती. स्वतंत्र प्रज्ञेने गाणारा हा कलावंत आपल्या घराण्याची गायकी गात नसे. परंतु स्वतःच्या सौंदर्य कल्पनेशी निष्ठा ठेवून होता; आणि त्याच्या या प्रामाणिकपणामुळेच एका वैशिष्टयपूर्ण गायकीचा जन्म झाला होता.

## कलाविष्कार आणि प्रगति

संगीतकलेच्या एकंदर प्रगतीच्या दिशे-कडे नजर टाकली तर हेच दिसून येते की, घराण्याची प्रतिष्ठा आणि परंपरा टिकवून ठेवण्याची दृष्टी असणाऱ्या संगीतकारां-कडून कलेच्या सौंदर्य कल्पनेमध्ये भर पडली नसून या उलट स्वतःच्या सौंदर्य कल्पनेशी प्रामाणिक राहणाऱ्या आणि स्वतंत्र प्रति-भेने परंपरेतून मुक्त होऊन कलाविष्कार करणाऱ्या कलावंताकडून कलेची प्रगती साधली गेली आहे. अमीर खुश्रोने म्हणे स्वतंत्र प्रतिभेने भारतीय संगीतात परि-वर्तन करण्याचा प्रयत्न केला आणि कलेच्या प्रगतीचा एक नवा टप्पा गांठला गेला. ध्रुपद गायकी अशीच-राजामानसिंगच्या प्रयत्नांतून निर्माण झाली, आणि सदारंग, अदारंग या प्रतिभावान कलावंताच्या धारिष्टयामुळेच सुंदर ख्याल गायकी पुढे येऊन संगीत कलेचा विकास झाला. कलेचा विकास साधणाऱ्या आणि गाण्याची रंगत उत्पन्न करणाऱ्या बहुतेक कलावंता-कडे पाहिले असता असे आढळून येते की, ज्या कलावंतांनी स्वतःच्या सौंदर्यानुभूतीशी निष्ठा ठेवली आहे, त्यानीच संगीतामध्ये स्वतः एक विशिष्ट स्थान निर्माण करून संगीताचा दर्जा वाढवला आहे. अगदी अलीकडची उदाहरणे घ्यायची म्हटली तर खांसाहेब फैयाजखां काय आपल्या गुरुंची म्हणजे गुलाम अब्बासखांची गायकी गात होते ? आणि त्याना आदर्श वाटणारे नथ्थनखां (विलायत हुसेनखां यांचे वडील) काय आग्रा घराण्याचे म्हणजे घग्गे खुदाबक्ष यांचे गाणे गात होते ? पं. भास्करबुवांनी तर आपल्या गाण्यात तिघा कलावंताच्या सौंदर्य कल्पनांचा मिलाफ करून स्वतःची अशी आगळी रंगत पैदा केली होती. पं. वझेबुवाही असेच बहुढंगी होते. जरी त्यांची स्वतःची तालीम ग्वाल्हेर घराण्यात होती तरी त्यांच्या गाण्याचा स्वतंत्र असा डौल होता. बडे गुलामअली-खांची पण स्वतःची अशी खास सौंदर्यदृष्टी आहे. आणि त्या कल्पनेशी प्रामाणिक असल्यामुळेच त्यांचे गाणे पटते. हृदयाला भिडते. अशी सर्व उदाहरणे पाहिली आणि त्यांच्या विशिष्ट सौंदर्य प्रणालीचे मर्म समजले तरी संगीत रसिक व कलावंत हा परंपरेच्या बंधनांतून सुटला आहे असे दिसत नाही. कारण या कलावंताचा



अनुक्रमणिका








कोणत्या तरी घराण्याशी संबंध जोडण्याचा हव्यास व त्याच्या उस्तादाला त्याच्या स्वतंत्र प्रतिभेबद्दल श्रेय देण्याची प्रवृत्ति, या क्षेत्रात नेहमीच दिसून येते आणि रसिक श्रोताही त्याच दृष्टीकोनातून त्याचे मूल्य-मापन करीत असतो. थोडक्यात कलेच्या प्रांतातील या गुरुबाजीपासून कलावंत स्वतः आणि त्याचा श्रोताही मुक्त नाही. समर्थ आणि श्रेष्ठ दर्जाच्या कलावंताची ही गोष्ट, तर मग इतर कलावंताचे तर विचारायलाच नको. ज्यांना या क्षेत्रात स्वतंत्र कर्तृत्व गाजवता आले नाही त्यांनी आपला मोठेपणा सिद्ध करण्यासाठी कोणत्या तरी श्रेष्ठ गुरुच्या तालमीचा आणि श्रेष्ठ घराण्याच्या परंपरेचा आश्रय घेतला आहे. जेव्हा एकादा सामान्य गायक, नामवंत कलावंताचे नांव उस्ताद म्हणून लावतो अथवा जेव्हा एकादा गुरु एकादा नामवंत शिष्य आपला शागीर्द आहे म्हणून सांगतो त्यावेळी सूक्ष्मपणे गुरुबाजीचा हा अहंकार पोसला जात आहे असे दिसून येते, नाही का?

## स्वकल्पनांशी प्रामाणिकपणा

कलावंताच्या कलागुणाचे मूल्यमापन करताना रसिक श्रोता पण, जेव्हा अमुक अमुक घराण्याचा कलावंत असून अमुक गुरूचे गाणे गातो अशा दृष्टीने पाहतो. तेव्हा तो कलागुणाकडे पूर्वग्रहयुक्त दृष्टीने बघत आहे असे सिद्ध होत नाही का? आणि तो ही संगीत क्षेत्रात चाललेल्या गुरुबाजीला अवास्तव महत्त्व देत आहे आणि गुरुबाजीला उत्तेजन देत आहे असे दिसत नाही का? विशेषतः नवीन प्रयोग करणाऱ्या आणि स्वतंत्रपणे आपल्या प्रतिभेचा विकास साधू इच्छिणाऱ्या कलावंताबद्दल पारंपारिक संगीतज्ञाचा दिसत असलेला विरोध व उपेक्षाबुद्धी या गुरुबाजीतूनच निर्माण झाली आहे असे वाटते. या पारंपारिक कल्पनेपासून मुक्त होऊन स्वतंत्रपणे कला सौंदर्याचे मर्म समजण्याची व त्याचा आनंद घेण्याची प्रवृत्ति वाढल्याशिवाय संगीत-कलेत गतिमानता येईल असे वाटत नाही.

तात्पर्य असे की, संगीतकलेमध्ये जर जिवंतपणा निर्माण करायचा असेल, संगीत कलेचा सतत विकास व्हावा अशी जर इच्छा असेल तर कलावंत होऊ इच्छिणाऱ्या प्रत्येक व्यक्तीने स्वतंत्र बुद्धीने पारंपारिक कल्पनांपासून मुक्त होऊन, स्वतःच्या सौंदर्यकल्पनेशी प्रामाणिक राहून संगीतविषयक कलासौंदर्याचा आविष्कार करण्याचा प्रयत्न केला पाहिजे. संगीत शिक्षणाला, गुरुच्या तालमीला, मुळीच महत्त्व नाही असा याचा अर्थ नव्हे. कलेचेसुद्धा शिक्षण असते. चांगल्या गुरूची तालीम पाहिजे, मांडणीत सुबकपणा रीत, स्वच्छपणा, सुरेलपणा, लयदारपणा येण्यासाठी चांगल्या गुरूंकडून शिक्षण हवेच. परंतु कलाप्रदर्शनामध्ये सौंदर्याचा आविष्कार करताना स्वतःच्या सौंदर्यानुभूतीशी प्रामाणिक राहण्याचा प्रयत्न प्रत्येक कलावंताने केला पाहिजे. आणि हे करताना केवळ लोकप्रियता मिळवण्याच्या दृष्टीने किंवा घराण्याची शिस्त पाळायची यासारखी बंधने आड येऊ देता कामा नयेत. माझ्या माहितीचे एक वयोवृद्ध कलाकार आहेत, त्यांच्या तरुणपणी मी एकदा त्यांच्याशी चर्चा करत असता, "तुमच्यावर भास्करबुवांच्या गाण्याचा काय परिणाम झाला?" असे विचारले होते. त्यावेळी त्यानी भास्करबुवांच्या गाण्यातल्या सौंदर्याचे दर्शन स्वतः गाऊन मला घडवले. मी विचारले–बुवा तुम्हाला हे गाणे पटते आणि तुम्हाला ते मांडता येईल असे तुमचे सामर्थ्य आहे तर तुम्ही तसं कां गात नाही? त्यानी उत्तर दिले की, "मी ज्या घराण्यात शिकलो आहे त्या घराण्याच्या गुरुजींचा मला आदेश आहे की, आपल्या घराण्याचे गाणे सोडू नकोस आणि माझी अशी जिद्द आहे की मी आपल्या घराण्याचे नांव आणि गाणे सोडणार नाही." आणि बुवा जन्मभर आपल्या या संकल्पाशी इमान राखून आहेत. स्वतःच्या सौंदर्यकल्पनेशी प्रामाणिक राहण्यापेक्षा घराण्याचे बंधन त्यांना जास्त महत्त्वाचे वाटले आणि पर्यायाने संगीतकलेचे नुकसान झाले.

## निकष कलेचा असावा

तेव्हा एकंदर या विवेचनाचा मुद्दा असा की, संगीतकलेमध्ये जो तोच तोपणा आला आहे आणि काही एक ठराविक कलावंत सोडून जो जिवंतपणाचा अभाव प्रतीत होतो आहे; आणि रंगत दिसेनाशी झाली आहे, त्याला ही पारंपारिक बंधने कारणीभूत आहेत असे वाटते. गवई कोणाचे गाणे गातो कुणाचे अनुकरण करतो, यापेक्षा सांगितीक गुणाच्या ज्या कसोटचा आहेत त्यावर तपासून कलावंताचा दर्जा ठरवणे आणि त्याच्या गायकीच्या सौंदर्याचे रसग्रहण करणे इष्ट होईल असे वाटते. कलारसिकांनी संगीतातल्या सुरेलपणा, लयदारपणा, निर्मळपणा, रसपरिपोष वगैरे गुणांच्या कसोटीवर कलावंताची कला घासून पाहिली तर कलेच्या प्रगतीच्या दृष्टीने ते जास्त उपयुक्त ठरणार नाही का? गुरुंची हुबेहूब याद करून देणे हा संगीतातला गुण समजायचा की आपल्या अनुभतीशी प्रामाणिक आहे ही महत्त्वाची कसोटी समजायची? या पारंपारिक सौंदर्यकसोटीमुळे काही प्रतिभावान कलावंतावर काही समीक्षकांनी अन्याय केला आहे असे त्यांच्या लिखाणावरून, बोलण्यावरून दिसते. या उलट गाणे नीरस असून केवळ तालीम, सच्चेपणाने गातो म्हणून कलावंताचा उदोउदो झाल्याची उदाहरणे दृष्टीस पडतात. तेव्हा मला पडलेल्या प्रश्नाचे माझ्या दृष्टीने उत्तर असे की, इतर कलाक्षेत्रामध्ये जसा कलामूल्यांचा स्वतंत्रपणे विचार होऊन सौंदर्याच्या काही विशिष्ट कसोटचा निर्माण झाल्या आहेत आणि नवकला निर्माण होऊन त्यातल्या कलांचा विकास झालेला दिसत आहे, त्याप्रमाणे संगीत क्षेत्रामध्ये पण आता अशी वेळ आलेली आहे की, घराणे, तालीम, गुरुपरंपरेचा अभिमान यापासून मानसिक दृष्टीने मुक्त होऊन सांगितीक मूल्यांचा स्वतंत्रपणे पूर्वग्रह विरहित दृष्टीने विचार झाला पाहिजे. असा विमुक्त विचार आणि मांडणी ही कलावंताच्या, कलेच्या विकासाच्या दृष्टीने आणि त्यात जिवंतपणा व नावीन्य आणायला उपयुक्त ठरेल.

• • •







अनुक्रमणिका

## संग्रही ठेवण्यायोग्य पुस्तक

**साहित्यदृष्टी** आणि जीवनदृष्टी यात विरोध नसला की, विचार आणि आविष्कार यांत विसंगति दिसत नाही. त्यातहि शिस्तशीर व्यासंग, अनाठायी पथ्यांचा अभाव आणि आपल्या भूमिकेबद्दल आत्मविश्वास ही असली की, विचार आणि आविष्कार स्पष्ट व स्वच्छ होतात. याला लालित्य आणि सहजता यांची जोड लाभली तर मग तोड नाही सापडत. ना. सी. फडके हे नांव केवळ उच्चारले किंवा निव्वळ लिहिले तरी हे लेखनविशेष चटकन् नजरेपुढे येतात, इतकी त्यांची साहित्यकार म्हणून गाजलेली कारकीर्द स्वयंसिद्ध आहे. किंबहुना असे म्हणता येईल की, पारदर्शक विचार, आवाहनात्मक आविष्कार, मुद्देसुदपणा, उद्बोधकता आणि रंजकता यांचे रमणीय मिश्रण असलेली त्यांच्यासारखी समीक्षा सापडतच नाही. त्यांचे 'प्रतिभा विलास' हे त्याचे ताजे आणि अप्रतिम उदाहरण होय.

फडके हे मुख्यत: कादंबरीकार म्हणून विख्यात आणि मान्य आहेत. मला आठवते की, 'किर्लोस्कर' मासिकात त्यांच्या कादंबरीची प्रकरणे क्रमशः जेव्हा झळकू लागली तेव्हा निजाम हैद्राबादसारख्या ठिकाणी देखील लोक अंकाची चातकासारखी वाट पाहायचे. महाराष्ट्रात अशांचीच संख्या अधिक आहे की, ज्यांच्या डोळ्यापुढे, फडके नांव कानावर पडताच, त्यांच्या एकाहून एक सरस कादंबऱ्यांतील मनाला गुदगुल्या करणारे लाडिक प्रसंगच काय त समूर्त होतात. पण फडके म्हणजे कादंबरीकारच हे समीकरण वस्तुस्थितीला धरून नाही. 'कादंबरी' हा फडक्यांचा साहित्य क्षेत्रातील 'षट्कार' खरा पण हा षट्कार मारणाऱ्या समर्थ लेखकाचे इतर साहित्य प्रकार लक्षणीय व अविस्मरणीय आहेत हे लक्षात घेणे आवश्यक आहे. फडके




### प्रतिभा विलास • पिंजरा

यांची कादंबरी वगळली तर ते उरत नाहीत असा प्रकार तर नाहीच उलट साहित्यकार म्हणून ते सरत नाहीत असा चमत्कार आहे. ललित निबंधाचे ते शिल्पकार–जनकच आहेत. कथा, परीक्षणे, वाङ्मय परीचय, रसग्रहणे, संगीत, क्रीडा, तर्कशास्त्र आणि समीक्षा या क्षेत्रात लिख्ये लेखणी चालवून साहित्यात त्यानी मौलिक भर घातली आहे. बरे, कादंबरी क्षेत्रात गति आणि प्रगति लाभली म्हणून त्या भांडवलाच्या जोरावर त्यानी 'समीक्षा केली असा प्रकार नाही. अगदी प्रथमपासून वाङ्मय विलासाच्या बाबतीत ठाम भूमिका असलेल्या या लेखकाने वाङ्मयाचे (व्याख्यान, परीचय, समीक्षा) प्रत्येक दालन खुलवण्याच्या बाबतीत रस घेतला आणि रस निर्माण केला. उलट **रसमयता** हा त्यांच्या सर्व साहित्याचा खरा विशेष होय. निरस असे त्यांच्या हातून काही लिहून झालेच नाही. समीक्षा रोचक व रंजक आणि सुबोध व सुरस करणारा हा साहित्यसम्राट केळकरानंतरचा पहिला साहित्यिक होय असे म्हटल्यास ते मुळीच अतिशयोक्तीचे ठरू नये. त्यांचे 'प्रतिभा साधन' आणि आचार्य जावडेकरांबरोबर झालेला वाद ही जी गाजली त्याचे रहस्य झाले तरी हेच होय. त्यांच्या 'प्रतिभा विलास' या पुस्तकात एकंदर दहा प्रकरणे सुमारे सव्वा दोनशे पानांवर विखुरलेली आहेत. गेल्या चार दशकात साहित्यविषयक साक्षेप आणि आक्षेप कितीतरी ढवळून निघाला. खुद्द फडक्यानी हिरीरीने आणि सातत्याने आपली मते सुसंगत केल्याचा इतिहास तसा जुना किंवा कालबाह्य नाही. ज्या काळी फडक्यानी आपल्या विचार प्रकटनास आरंभ केला तेव्हापासून ते आजतागायत पुरोगामीच राहिले आहेत. त्यांच्या प्रस्तुत पुस्तकातील 'कलात्मक साहित्याचं उगमस्थान', 'कलात्मक साहित्याच आवाहन', 'चतरंगी प्रतिभा', 'कलात्मक साहित्याचा प्राणवायु: रस,' 'सत्यं शिवं सुंदरम,' 'प्रतिभा आणि प्रचार,' 'लोकसाहित्य : वर की शाप?,' 'साहित्यातील श्लील आणि अश्लील,' 'नवकथा!–एक चिंतन आणि चिंता' आणि 'समारोप' या प्रकरणातून नुसती ओझरती नजर फिरवली तरी याचा पडताळा मिळतो. यावरून फडक्यांची झेप, जागरूकता आणि रसिकता किती सर्वस्पर्शी आहे याचीहि कल्पना यावयास हरकत नाही.

फडक्यांची वाङ्मयाकडे पाहण्याची म्हणन एक दृष्टी आहे. 'कलावादी' म्हणन त्यांना एका गटात सामील केलेले असले तरी त्याने त्याचा पूर्ण अर्थबोध होत नाही. 'कलावादी' आणि 'जीवनवादी' हे दोन 'वाद' जरी असले तरी त्यांचा फेरा साहित्याभोवती आणि साहित्याच्या जीवनाभोवती असतो हे मूलतः कुणीहि अमान्य करू शकत नाही. फडके ज्या काळात आपली भूमिका विचारपूत करत होते त्या काळात 'कलावादी' आणि 'जीवनवादी' ह्या दोन त्यावेळच्या सामाजिक–राजकीय वातावरणाच्या प्रतिक्रिया होत्या. समाजच पहिल्यांदा सुधारला पाहिजे असा अत्याग्रह असलेला जसा एक गट होता. तसाच








स्वातंत्र्यच प्रथम प्राप्त केले पाहिजे असा सत्याग्रह करणारा दुसरा गट होता. या दोन्ही गटांचे म्होरके साहित्याचा शुद्ध आणि निर्भेळ विचार-विवेक करण्याच्या मनःस्थितीत नव्हते. जीवन जगणारा एक मोठा गट (तो नेहमीच असतो) असा होता की, ज्याला साहित्याचे अगत्य अशा संदर्भात नव्हते. अशांना फडक्यांची भूमिका तात्विक विवेचन व विश्लेषणाला अनुसरून पटावयाच्या ऐवजी व्यावहारिक पातळीवर सोईस्कर वाटली. फडक्यानीहि याचा विचार सतत विकसन-उत्क्रांती-क्षम ठेवला नाही. याचाच परिणाम म्हणून फडके जे पूर्वी बोलले तेच आज बोलत आहेत असे जाणवते. यात सुसंगति असली तरी सचेतन साहित्याला जी अनेक परिमाणे निर्माण झाली त्याचा त्यांच्या आविष्कारात कानोसाहि दिसत नाही. या दृष्टीने त्यांच्या मीमांसेला कमालीच्या मर्यादा पडलेल्या आहेत. आणि जिथे अशा मर्यादा पडलेल्या आहेत तिथे त्याची उणीव मग फडके पोटतिडकीने किंवा ममत्वाच्या काळजीने भरून काढण्याचा प्रयत्न करतात. अर्थात् ते तर्काला व चिकित्सेला पटत नाही. उदाहरणार्थ, त्यांचे 'नवकथा ! एक चिंतन आणि चिंता' हे सर्वच्या सर्व प्रकरण पाहण्यासारखे आहे. वातावरणातून व्यक्ति आणि व्यक्तितून व्यक्तीचे अंतर्मन आणि या आतील मनाचे महाभारत हा एक आजच्या साहित्याचा विषय तसाच जे वातावरण मानवाने निर्माण केले ते कणाकणाने व घटित–घटनांनी जे अजस्र बनले ते मानवामुळेच हा एक विषय. याच्या चिंतनाला कोणचाहि ठोकताळा किंवा दंडक केव्हाहि अपुराच पडणार. एखादा प्रसंग, एखादी जागा, एखादी डूब (इ. इ.) निर्मितीस निमित्त ठरता ठरताच त्यातून आधुनिक जगाची एक प्रतिकृति संपन्न होते. बकेटचे 'वेटिंग फार गोडो', चि. त्र्यं. खानोलकरांची 'अजगर,' पु. शि. रेग्यांची 'सावित्रि' आणि हमीद दलवाईंची 'इंधन' (व अलिकडील रमेश मंत्र्यांची 'महानगर') या कलाकृति आजच्या जीवनाच्या आकृतिबंधातून पाहिल्यास उमजू शकतात. नसता 'एकमेकाशी संबंध नसलेली चित्रे एवढंच कादंबरीचं स्वरूप' असं फडक्यांच्यासारखं कुणालाहि वाटायचं.

फडक्यांच्या विवेचनातील ही मर्यादा सोडली तर त्यांचे 'प्रतिभा विलास' हे पुस्तक निर्दोष म्हणावे लागेल. पण तेवढ्यानेच त्याचे मोल पूर्णपण स्पष्ट होणार नाही. कारण या पुस्तकात साहित्याच्या निर्मितीच्या आणि निर्मित साहित्याबावत जो उहापोह केला आहे तो कुणाहि रसिकास व अभ्यासूस सतत पूरक ठरणारा आहे. असे सुबोध व सुंदर विवेचन अन्य कुणी केले नाही. मराठी साहित्यात अशी सूत्रबद्ध चर्चा करणारे इतक्या सोप्या आणि लालित्यपूर्ण भाषत लिहिलेले हे पहिलेच पुस्तक म्हणावे लागेल. पाश्चात्य, संस्कृत आणि मराठी साहित्याचा तौलनिक अभ्यासाबरोबरच साहित्य संकल्पांच्या विनियोगाचे (application) सहज निरूपण जे या पुस्तकात अनुस्युत आहे तो या पुस्तकाचा आणखीन् विशेष होय. त्याचप्रमाणे 'लोक साहित्य,' 'श्लील आणि अश्लील' या बावतची चर्चाही अतिशय वस्तुनिष्ठ व लक्षणीय झालेली आहे. लोकसाहित्याचा 'महत्वाचा अर्थ असा की बहुजन समाजाला देखील कलात्मक साहित्याचा रस घेता आला पाहिजे' या त्यांच्या मताशी कुणीहि सहमतच होईल. त्याचप्रमाणे, साहित्यातील श्लील अश्लील ठरवण्याची जागा कोर्टकचेरी नव्हे एवढी सूचना करूनच ते थांबले नाहीत. त्यानी एक मजेदार पण विधायक तोडगा सुचवला तो असा, 'लेखक जर म्हणाला की मला हवं तसं लिहिण्याचं स्वातंत्र्य आहे, तर जबाबदार साहित्यिकानी त्याला असं सांगितलं पाहिजे की ठीक आहे, हवं तसं लिहिण्याच्या तुझ्या हक्काच्या आड आम्ही येत नाही, परन्तु मतप्रदर्शनाचा हक्क आम्हालाहि आहे, तुझा धिक्कार करण्याचं स्वातंत्र्य आम्हालाहि आहे आणि तुझ्या साहित्याला आम्ही प्रतिष्ठा मिळू देणार नाही !

असं हे प्रत्येकाने संग्रही बाळगण्यायोग्य पुस्तक आहे !

**–दा. गो. देशपांडे**

[**प्रतिभा विलास** – ले. **ना. सी. फडके.** विश्वकर्मा साहित्यालय पुणे–९. मूल्य १० रु.]

## पिंजऱ्याच्या तारांवर विरणारी स्वप्ने

**अपमान,** उपहास, क्षणोक्षणी होणारे व निमुटपणाने सहन करावे लागणारे स्वप्नभंग, कौटुंबिक जीवनात वाट्याला येणाऱ्या दारिद्र्याच्या यातना. त्यात होणारी शारीरिक व मानसिक कुचंबणा. त्या कुचंवणातून सुटण्यासाठी होणारी धडपड. त्यात येणारे अपयश, त्यातून वाढणारी तगमग. मूल्याना जाणारे तडे, भावनांचे प्रक्षोभ–प्रक्षोभातून वाट्याला येणारे दारुण मनोभंगाचे प्रसंग आणि पिंजऱ्यातच अखेर हे सारे सहन करीत रहात असतानाच नियतीने केलेली भयानक मुक्तता ह्यांची **'पिंजरा'** ही कथा आहे. ह्या कथेत प्रणयाचे रूढ त्रिकोण-चौकोन. षट्कोन नाहीत. भावडा समाजवाद नाही. उसनी व नाटकी देशभक्ती नाही. ह्यात भयानक वास्तवाचे रोखठोक चित्रण आहे. सामान्य माणसाच्या वाट्याला येणारे 'भोग' आहेत. त्याच्या उपभोगांच्या स्वप्नातूनही त्याच्या वाट्याला येणार 'भोग' आहेत. आणि हे भोग आणि उपभोग यातलं काहीच आपल्या हाती नसल्याने अगतिक बनलेल्या जीवनाचा अगतिकपणेच घडलेला मृत्यूही आहे. माणसांचा, परिस्थितीचा; त्यांच्या स्वप्नांचा आणि स्वप्नभंगांचाही !

पुरुषोत्तम भास्कर भावे ह्यांची लोकसत्तेच्या १९६४ सालच्या दिवाळी अंकातील 'पिंजरा' ही कादंबरी पुण्याच्या कुलकर्णी ग्रंथागारतर्फे आता पुस्तकरूपाने प्रसिद्ध झाली आहे. भावे यांच्या लेखणीतली झेप, विदारक जीवनचित्राचा आविष्कार करीत असताना तिला येणारी अरोधाची धार. स्वप्नांच्या कक्षेत फिरत असताना तिला येणारी काव्यात्मता, सामान्य माणसाच्या दारुण स्वप्नभंगांचे चित्रण करीत असताना जागोजागी प्रगट होणारी कणव, मूल्यशून्य माणसे आणि मूल्ये मानीत मानीत पण अवमानित जिणे जगत जगत मृत्यूच्या सीमेवर उभी राहणारी माणसे, उपभोगाना प्राधान्य देणारी आणि असेल नसेल ते देऊन टाकूनही

अनुक्रमणिका







कधीही खंक न होणारी माणसे अशा विविध माणसांच्या भावविश्वात ही कादंबरी आपल्याला घेऊन जाते. यात दिगंबरपंत, त्यांची पत्नी सगुणाबाई व मुली यांच्या कुटुंबाची नियतीने केलेली ससेहोलपट ह्याचे चित्रण प्रामुख्याने आले असले तरी ही कादंबरी केवळ त्या कुटुंबाची शोकांतिका रहात नाही. त्यांच्या अनुषंगाने 'थिटे चाळ' व तीमधील विविधरंगी माणसे ह्यांचेही तितकेच महत्त्वपूर्ण चित्रण यात येते. त्यामुळे ह्या कादंबरीला एक अधिक व्यापक अशी बैठक प्राप्त झाली आहे. ह्या कादंबरीतल्या घटना ह्या केवळ घटना रहात नाहीत. त्या घटनांच्या धाग्यातून एक विविध स्तरातले जीवन, त्यातले हर्षापर्ष, जय पराजय हे आकार घेतात. तरीही प्रामुख्याने दिगंबरपंतांच्या जीवनाभोवती ही कथा फिरत राहते. पण त्यांचे दुःख हे केवळ त्यांचे रहात नाही. अशा तऱ्हेचे बंदिस्त जीवन जगावे लागणाऱ्या सर्व वर्गाचेच हे व्यापक दुःख बनते. ह्या पिंजऱ्यातली माणसे इतकी दुर्दैवी, इतकी अगतिक (व गतानुगतिक) की, साध्या स्वप्नांवरसुद्धा त्यांचा अधिकार चालत नाही. ती जीवन ढकलीत राहतात. त्यांचे जीवन जसे त्यांच्या हाती नसते त्याचप्रमाणे त्यांचा मृत्यूही ! मग वाचकाचे मन भरून जाते अपार सहानुभूतीने. तो अंतर्मुख होतो आणि काहीसा सुन्नही ! पंतांच्या जीवनातले आवेग, उद्वेग. त्यांचा संताप आणि त्यांची कुचंबणा—ह्या साऱ्यांविषयी करुणा उत्पन्न होते. विशेषतः ह्या साऱ्यातून सुटण्यासाठी (निदान काही क्षण तरी) ते दारू पितात. चांगले कपडे घालतात. पैसे भरपूर घेतात. टॅक्सीने चांगल्या वेश्यांच्या वस्तीत जातात. काही तास तरी तो पिंजरा मोडून तोडून फेकून देण्याची ऊर्मि त्याना येते. ती झेपही मोठी आणि त्यांच्या मुलीच्या रूपानेच त्याना नियतीने सादर केलेला पराभवही मोठा ! ही पिंजऱ्यातली माणसे कितीही धडपडली तरी अखेर गज तुटणार नाहीत ह्यांचेच मस्तक विदीर्ण होईल हेच खरे !

पु. भा. भावे ह्यांच्या समर्थ लेखणीने हे विदारक सत्य फार प्रभावीपणे ह्या कादंबरीत मांडले आहे. हा जणु एक आक्रोश आहे—प्रकट आक्रोश ! त्या वर्गाचीच जणु ही एक किंकाळी आहे. ह्या कादंबरीच्या शेवटाबद्दल काहीसे मतभेद संभवतील. ह्यात ती सारी चाळ कोलमडते आणि ही बहुरंगी जीवने आपापल्या सुखःदुखानिशी 'शांत' होतात असे दाखविले आहे. पंत वेश्यागारातून एक प्रचंड धक्का घेऊन परत येतात. त्यांच्या दुःखांचा तो सर्वोच्च बिंदु—त्यानंतर त्यांचे घरी येणे आणि नंतर चाळ पडणे व सर्वांचाच मृत्यु ह्या गोष्टी काहीशा घाईने आल्यासारख्या वाटतात. त्याठिकाणी दारुने झिंगलेले,, वेश्यागारात मुलीला पाहून विदीर्ण झालेले पंत त्याच तिरीमिरीत कुठेतरी कोलमडले. गाडीखाली सापडले. मोटारच्या धक्क्याने गेले वा पंगु झाले असे काही येणे अपरिहार्य होते असे वाटते. सारी थिटे चाळ पडते आणि सारेच संपते. सारा पिंजराच नाहीसा होतो. मृत्यूनेच हा पिंजरा नाहीसा होतो हेच तर लेखकाला सुचवायचे नसेल ?

एका वेगळ्याच स्तरावर सतत राहणारी, प्रभावी कादंबरी म्हणून 'पिंजरा' ह्या कादंबरीचा उल्लेख करता येईल.

**—प्रभाकर अत्रे**

[**पिंजरा पु. भा. भावे**, प्रकाशक. कुलकर्णी ग्रंथागार, १८६, शनवार, पुणे, २. मूल्य चार रुपये].



दी पा व ली ची सन्मानपुष्पे

## संशोधक साहित्यिक

**टीकाकार** हा साहित्यिक आहे की नाही असल्यास त्याला साहित्य संमेलनाचा अध्यक्ष करावा की नाही, कवि, कादंबरीकार विरुद्ध टीकाकार अशी लढत झाली तर कवि, कादंबरीकाराना अग्रक्रम द्यावा की साहित्य टीकेला द्यावा वगैरे फालतु 'कागदी' लढाया मागे लढल्या गेल्या. त्या लढाईत कथाकार, कादंबरीकार, कवि, टीकाकार ह्यांच्यापैकी कुणीही 'दगावला' नाही, जखमीही झाला नाही. जखमी झाली साहित्यविषयक चळवळ, तडे गेले ते साहित्यावर उदंड भक्ति आणि प्रेमच करणाऱ्या रसिकांच्या निष्ठांना ! आता लढाई थमली आहे त्यानंतरच्या चिंतनात. कादंबरीकारांबरोबरच टीकाकार मंडळींनाही 'मानाची पाने' मिळत आहेत. बहुप्रसवा कवि कथाकारांबरोबर (त्या प्रसूतीला 'लूप'ची बाधा नसो) चार सहा वर्षांच्या मूक व एकाकी संशोधनानंतर एखादा ग्रंथ प्रसविणाऱ्या संशोधक टीकाकाराचाही गौरव मराठी शारदेच्या दरबारात होत आहे हे सुचिन्ह आहे. 'साहित्य टीका' हेही एक प्रकारचे नवनिर्माणच आहे ह्याबद्दल आता फारसा कुणी वाद घालीत नाही. कवी इतकाच 'क्रिटिक' हाही एक 'क्रिएटिव्ह आर्टिस्ट' आहे असे मानण्यात काही चूक होते आहे असे आता कुणाला वाटत नाही. त्याचा प्रत्यय म्हणूनच की काय भोपाळ येथे भरणाऱ्या सत्तेचाळीसाव्या मराठी साहित्य संमेलनाच्या अध्यक्षपदी नागपूर विद्यापीठाचे कुलगुरु व प्रसिद्ध संशोधक-टीकाकार **डॉ. विष्णु भिकाजी कोलते** ह्यांची निवड झाली आहे—अविरोध निवड झाली आहे.

डॉ. वि. भि. कोलते यांचा जन्म २२ जून १९०८ साली बुलढाणा जिल्ह्यातील नरीवेल गावी झाला. माध्यमिक शिक्षण खामगांवला पूर्ण झाल्यावर त्यानी नागपूरच्या मॉरिस कॉलेजात उच्च शिक्षणासाठी प्रवेश केला. १९२९ साली ते बी. ए. झाले. पुढे एम्. ए. व एल्. एल्. बी.चा अभ्यास त्यानी सुरू केला. १९३१ साली त्यानी ह्या परीक्षेत उत्तम यश मिळविले. आणि **ना. के. बेहेरे** व **के. बी. मालक** सुवर्णपदके संपादन केली. कायद्याची पदवी संपादन केलेली असली तरी वृत्ति मात्र सर्वस्वी शिक्षणानुकूल असल्याने त्यानी अमरावतीच्या किंग एडवर्ड कॉलेजात प्राध्यापकी पत्करली. १९४४ साली ते मॉरिस कॉलेजात मराठीचे प्राध्यापक म्हणून गेले. १९५९ साली त्यांची त्याच कॉलेजचे प्राचार्य म्हणून नियुक्ति झाली. त्याच साली नागपूर विद्यापीठात ते 'मराठीचे रीडर' म्हणून होते. १९६१ ला ते नागपूर विद्यापीठाचे डीन ऑफ फॅकल्टी ऑफ आर्टस् झाले. १९६४ पर्यंत ते तेथेच होते.

डॉ. कोलते हे नुसते प्राध्यापक नाहीत तर संशोधक प्राध्यापक आहेत. कोलते ह्यानी 'महानुभाव वाङमय' हा संशोधनाचा प्रमुख विषय बनविला व त्यावरच नागपूर विद्यापीठाने 'डॉक्टोरेट' ही पदवी देऊन त्यांचा गौरव केला. तो प्रबंध १९४५ साली प्रसिद्ध झाला. त्यानंतरहि त्यानी त्याच विषयाचे संशोधन चालूच ठेवले व अनेक पोथ्या व ग्रंथांच्या आवृत्त्या साक्षेपाने संपादित केल्या. **भास्कर भट्ट, बोरीकर, चक्रधर चरित्र**, हे ग्रंथ तर अभ्यासकास मौलिक सहाय्य देतात ह्याशिवाय उद्धवगीता, रुक्मिणी स्वयंवर, शिशुपालवध इत्यादि महानुभावी काव्याच्या आवृत्त्यांचे संपादन त्यांनी केले आहे.

डॉ. कोलते हे संशोधक टीकाकार असले तरी प्रा. रा. श्री. जोग, वा. ल. कुलकर्णी, श्री. के. क्षीरसागर इत्यादि टीकाकारांप्रमाणेच 'ललित' प्रकृतीचे टीकाकार आहेत. कविता-नाटकाशी त्यांचे जवळचे नाते (हृदयाचेच म्हणतो) आहे. **लव्हाळी** हा त्यांचा कवितासंग्रह (१९३३) सोडचिठ्ठी हे नाटक (१९३९) त्याचा प्रत्यय देतील. महाराष्ट्राचे अग्रगण्य टीकाकार हे वृत्तीने 'सुललित' आहेत म्हणूनच मराठी टीका ही बोचरी असूनही 'विखारी' नाही. ती जगते, जगविते. प्रेरणाही देते. डॉ. कोलते हे असे 'निर्माणक' संशोधक आहेत. तेच ते विषय चिवडीत न बसता त्यानी 'महानुभावी' स्पेशलायजेशन' सिद्ध केले यातच त्यांची 'स्वयंप्रज्ञा' दिसून येते. डॉ. कोलते हे साहित्य अकादमी व महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृति मंडळाचे सदस्य आहेत. याशिवाय विविध साहित्य विषयक आंदोलनांशी, समित्यांशी त्यांचा फार जवळचा संबंध आहे. डॉ. कोलते गतवर्षी नागपूर विद्यापीठाचे कुलगुरु झाले. त्यांच्या अनेक सुधारणा महत्त्वपूर्ण ठरल्या आहेत. विद्यापीठाचे माध्यम 'मराठी' व्हावे म्हणून त्यांनी सुरू केलेल्या प्रयत्नांत पदवीदान समारंभाचे संपूर्ण मराठीकरण करण्याचा त्यांचा अलिकडचा प्रयत्न मराठी भाषिक जनतेने लक्षात घेण्यासारखा आहे. कोलते सर्व अर्थानी 'मराठी' आहेत. हा मराठी माणूस आता 'अमराठी' भोपाळातल्या संमेलनाचा अध्यक्ष म्हणून जातो आहे. रसिक, संशोधक व मराठी बाण्याच्या ह्या 'कृतिशूर' साहित्यिकाचे आम्ही अभिनंदन करतो व डॉ. कोलत्यांची ही मुलुखगिरी मराठीच्या जिरेटोपात एक मानाचा तुरा खोवील असा विश्वास व्यक्त करतो.








# 'लढाई' हरूनही 'युद्ध' जिंकणारे दयानंद बांदोडकर

गोव्याचा जनमत कौल महाराष्ट्राच्या विलीनीकरणाबाबत विरुद्ध गेला. तेव्हा त्या विलिनीकरणासाठी जिवाचे रान करणाऱ्या बांदोडकरांनी जे उद्‌गार काढले होते त्याचे ह्याप्रसंगी स्मरण होते आहे. ते म्हणाले होते की "लढाई हरलो असलो तरी युद्ध आम्हीच जिकणार आहोत." विलिनीकरणाबाबतचा कौल विरुद्ध गेला तेव्हा पोर्तुगालचे हितचिंतक व गोवा-महाराष्ट्र विलिनीकरण विरोधी शक्तींनी कंबरा कसल्या होत्या व गोव्याचे स्वतंत्र राज्य झाले पाहिजे ही मागणीही नोंदविली गेली होती. कौल विरुद्ध गेल्याने 'जितं मया' म्हणणाऱ्या शक्तींना दयानंद बांदोडकर यांच्या नेतृत्वाखाली 'महाराष्ट्रवादी गोमंतक'ने युद्धाचे जणु आव्हानच दिले आणि सर्व फुटीर व्यक्ति व शक्तींना धूळ चारून अखेर गोव्यात पुन्हा एकदा आपल्या पक्षाची राजवट सुरू केली आहे. दयानंद बांदोडकर हे पुन्हा एकदा त्या कर्तृत्वाचे शिल्पकार ठरले आहेत. दयानंद बांदोडकर ह्यांच्या ह्या यशाचे नेमके गमक कोणते? ती ही की बांदोडकर हे साधे, सरळ शिपाई गडी आहेत. राजकारणात 'बुध्दिबळा' चा डाव खेळावा लागतो. शत्रूची प्यादी खिडीत गांठून ठोकावी लागतात. कधी कधी पटासकट डावही उधळून टाकावा लागतो. ह्या सैनिकी बाण्याच्या बांदोडकरांना 'जनमत कौला'चा खोडा धूर्त राजकारण्यांनी घातला आणि क्षणिक यशाचे ढोल डिंडिम पिटून घेतले. वचन-बद्ध असलेली महाराष्ट्र काँग्रेस व तिचे तथाकथित राणाभीमदेवी नेते ह्यानी जनमत कौलाचे वेळी बांदोडकर यांची जणु गंमत केली आणि पाहिली. शेवटी बांदोडकर स्वतःच उभे राहिले व त्यानी पुन्हा साऱ्या शक्ति उभ्या केल्या.

गेल्या वेळच्या निवडणुकीपेक्षांही त्यांच्या ह्या वेळच्या यशाचे मोल मोठे आहे हे जाणून घेण्याची गरज आहे. ३० जागांसाठी एकूण २२६ उमेदवार उभे होते. त्यापैकी स्वतंत्र उमेदवारांची संख्या १५७ होती. बांदोडकरांची मते फोडणे एवढेच काम ह्या उमेदवारांकडे होते. 'बोलविता धनी' वेगळाच होते हे सूज्ञांस सांगणे न लगे! एकेका मतदारसंघात १०।१५ उमेदवारांचा पराभव करून म. गो. पक्षाचा उमेदवार निवडून आला आहे. बांदोडकरी विजयाचे दुसरे वैशिष्टय म्हणजे असे की, पांडुरंग शिरोडकर, विश्वनाथ लवंदे, टोनी फर्नांडिस ह्यासारख्या माजी सहकाऱ्यांचा त्यानी निर्विवाद पराभव घडवून आणला आहे. नवीन, ताज्या दमाच्या, विविध क्षेत्रातल्या माणसाना त्यानी हाती धरले आहे. गोव्याच्या नव्या मंत्रिमंडळात फक्त बांदोडकर जुने (आणि आता जाणीतेही) आहेत. बाकी रक्त नवे आहे. त्यांनी नुकतीच मोरारजीभाईजवळ (अर्थमंत्री म्हणून) अशी मागणी केली आहे की, जो पैसा एखाद्या योजनेत उरला असेल तो दुसऱ्या, महत्त्वाच्या योजनेवर खर्चण्याची अनुमति असावी. ही विनंती नवी व नव्या दृष्टीचीही द्योतक आहे. गोवा विकसित व्हायचा आहे. अशा वेळी ह्या सूचनेचे महत्त्व ध्यानी येते. गोव्यात प्रामुख्याने हिंदुमतदारसंघातून म. गोमन्तक व ख्रिश्चन मतदार-संघातून यु. गो. निवडून आले. ही धार्मिक कोंडी फोडण्याचा प्रामाणिक (व राष्ट्रीय वृत्तीचा) प्रयत्न म. गो. पक्षाने केला. १३ हजार हिंदु मतदार असलेल्या मांद्रे मतदार संघात म. गो. ने टोनी डिसूझा याना उभे केले. तेथे बहुसंख्य हिंदू मतदारांनी मते देऊन त्यांना विजयी केले. एका नव्या दृष्टीचा हा विजय आहे. बांदोडकर खरे राजकारणी नाहीत (असे तेही सांगतात) पण बांदोडकर हुशार आहेत, कल्पक आहेत. सच्चे आहेत, निष्ठावंत आहेत, काहीसे आग्रहीही आहेत. पण ह्या गुणादुर्गुणांसकट 'प्रेम करावे' असाच हा नेकीचा माणूस आहे. महाराष्ट्राचे नेतृत्व संकुचित व स्वयंकेंद्रित नसते तर ह्या माणसाच्या प्रयत्नांना फार वेगळी धार आली असती. 'कौला'चा फसवा डाव खेळला गेला नसता. शांता दुर्गा अंबाबाईला भेटायला आली असती. आग्वादच्या किल्ल्याने रायगडाची जयगाथा गायिली असती. मंगेशजी महाकालाला भेटायला आले असते.

कुणी सांगावे! अजूनही हे घडेल आणि बांदोडकरच त्या महान् पर्वाचे नायक असतील. नामदार मख्यमंत्री बांदोडकरांचे आम्ही अभिनंदन करतो.

**—आदित्य**

## लिमलेटची गोळी

**लिमलेटची गोळी बाराही महिने आबाल वृद्ध चवीने चाखतात. क्रिकेटचे आपले वेडहि तसेच आहे, नाही? तल्यार-खानपासून तात्यांपर्यंत प्रत्येकजण तो विषय चघळीत असतो. चव निराळी इतकेच. वेस्ट इंडिजच्या द्रुतगती गोलंदाजीला पिंजून काढणारे भारतीय छावे इंग्लंडच्या मैदानावर क्रिके-टच्या आजोळी उतरत आहेत. म्हणून हा सदैव सर्वप्रिय विषय पुन्हा एकवार 'दीपावली' जून अंकात आला आहे.**

## श्री. जितेंद्र अभिषेकी 'यांची कथा नारायणी'
## आणि
## नाच हृदया आनंदे

नृत्याविषयी **सौ. चित्रा वडगांवकर** यांचा हा सर्वांगपरिपूर्ण लेख पृष्ठसंख्येच्या मर्यादेमुळे नाईलाजाने 'जून'च्या अंकात प्रसिद्ध करीत आहोत.

**—संपादक**












अनुक्रमणिका



# असे पाहिले असे ऐकले

## कानेटकर-गोखले झिंदाबाद

**नाटक** लिहिता, ती चांगली लिहिणं, त्यांना चांगला नट-संच लाभणं, दिग्दर्शक लाभणं, पहिल्या प्रयोगावर टीकाकारांनी 'चांगलें' अभिप्राय लिहिणं, त्या नाटकाची 'स्तंभीय भविष्ये अक्षरशः 'वधस्तंभा' वर चढवून प्रेक्षकांनी ते 'उचलणं' डोक्यावर घेऊन नाचणं, त्याला शंभर, दोनशे, तीनशे. . . वगैरे प्रयोगांचे 'भाग्य' लाभणं वगैरे गोष्टी म्हणजे चमत्कारच ! निदान आजतरी (कारण नाटकं चालण्यापेक्षा 'पडण्या'चाच काळ आहे) हा चमत्कार 'इये मराठीचिये नगरी' घडला. तो घडविणारे जादूगार नाटककार म्हणजे प्रा. **वसंत कानेटकर** व श्री. **विद्याधर गोखले**. चांगल्याला चांगले म्हणायचं. दाद द्यायची हा पडला माझा स्वभाव ! त्यामुळेच मी म्हणतो कानेटकर-गोखले झिंदाबाद ! मराठीत अभिनंदन ! अगणित वेळां अभिनंदन !!

'रायगड'च्या शिवाजीने 'इतिहास' घडविला. शतकानुशतके पुरणारा व जपून ठेवावासा वाटणारा ! कानेटकरांच्या रायगडा-नेही ("इतिहासाचा खून पाडून" वा त्याला "गिरगांवच्या चाळीत आणून" पांढरपेशा थरावर संभाजी-शिवाजीला नाचवूनही—इति टीकाकार) मराठी नाटकांच्या इतिहासांत नवे पर्व रेखाटून ठेवले आहे. वाद होत राहतील. व्हावेतही. पण मराठी प्रेक्षकाने 'दाद' दिली आहे ती कानेटकर-रायगडाला. कानेटकर हे आजचे आघाडीवरचे भाग्यवान नाटककार ठरले आहेत. त्यांच्या 'अश्रूंची झाली फुले'ने तर विजेच्या घोड्यावर बसून वाटचाल केली आहे. 'मत्स्यगंधा' ही 'शतकांची भागी' करीत आहेतच. कानेटकर हा प्रयोग-प्रतिष्ठेचा परवलीचा शब्द रूढ होऊं पहात आहे. आम्ही कानेटकरांचे अभिनंदन करतो. धी गोवा हिंदु असोसिएशन झिंदाबाद !!

विद्याधर गोखले म्हणजे शेर-शायरी-म्हणजेच संगीत (व संगीतातली दर्द—व दर्दीपणही). गोखल्यांनी 'पंडितराज जगन्नाथ' ह्या नांवाने जनता रसिक बँकेत खाते उघडले. त्या खात्यात लाख (मोलाचे) अलंकार आहेत हे नंतर त्यांनी सिद्ध करून दाखविले. पैशाच्याच परिभाषेत बोलणारी माणसेही गोखले 'लाखाचे धनी' आहेत असे म्हणतात. पण आम्ही मात्र त्या अर्थाने म्हणत नाही. मदनाची मंजिरी, सुवर्ण तुला, मंदारमाला ह्या 'संगीत' (मय) नाटकांनी व अलिकडच्या जय जय गौरीशंकर-सारख्या नाटकांनी गोखल्यांनी किर्लोस्कर-खाडिलकर-गडकरी जमान्यातल्या 'संगीत' नाटकाचे 'दिवस' खेचून आणले आहेत ! **'मंदारमाला'** ह्या नाटकावरही (मानापमानप्रमाणे—तेवढी मोठी व छापील पुस्तक म्हणून नसेलही) खूप खूप टीका झाली. पण 'मंदारमाले' ने नुकताच राजधानीत आपला त्रिशतक महोत्सवी झेंडा मिरवला. व दिल्लीकरांची दाद व दुवा घेतला. मंदारमालेचे हे भविष्य स्वतः राम मराठे, प्रसाद सावकार व ज्योत्स्ना मोहिले घडवितात. कानांत घुमत राहतात गोड व असामान्य सूर! गोखल्यांना 'संगीत' नाटकांचे 'सूर' सापडले आहेत. तंबोरे मस्त जुळून गेले आहेत. सायीला बडी बडी माणसे बसली आहेत. राम मराठ्यां-पासून ते भालचंद्र पेंढारकरांपर्यंत आणि रामदास कामतांपासून ते आशालता वाबगांवकर—मोहिल्यांपर्यंत ! गोखल्यांच्या मनात तर रसवंती नाचते आहे. 'संगीत नाटकांचे वेड' महाराष्ट्रांत (एक चांगले वेड हं) उत्पन्न करणारा 'तपस्वी' बालगंधर्व शरपंजरी पडून असतांना संगीत 'मंदार'ने दिल्ली गाजवावी हा योग पाहिला ना की, मला सावरकरांची आठवण येते. लाहोरच्या सीमेवर सेना उभी राहिली आणि सावरकर रुग्णशय्येवरून उठून बसले. बालगंधर्वांच्या हयातीतच हा 'संगीत' चमत्कार करणाऱ्या गोखल्यांचे (व साथींचे) अभिनंदन !!

## चला 'उठा' (उठा म्हणायला हवं) जोडे मारा

महाराष्ट्राच्या दोन नाट्य-शिल्पकारांचं अभिनंदन केल्यानंतर 'मराठी'त महाराष्ट्राचे नाक कापून, चांगल्या चित्रपट परंपरेचा 'फज्जा' (वा खिमा-जो जैसा चाहे) करणाऱ्या एका चित्रपट निर्मात्याचा 'निषेध' नोंदविण्याची पाळी यावी ! अरे यांना नाही जमत तर असल्या भ्रष्ट नकला करतात कशासाठी ? 'ब्रह्मचर्य' हा विषय मोठा गंमतीचा ! आचरणाऱ्याच्या आणि पाहणाऱ्याच्या दृष्टीनेही. प्रेमात आणि युद्धात जसे सर्व काही 'क्षम्य' मानले जाते तसे 'ब्रह्मचर्यात' मानले जाऊं नये अशी अपेक्षा असते. ते जमत नाही. मग घडतो विनोद. 'अस्वाभाविक' असे काहीही खपवून घेण्याचा शरीराचा 'स्वभाव' नसल्याने स्वाभाविकपणेच 'ब्रह्मचर्या'ची फर-फट होते. त्यातली खुमारी 'ब्रह्मचारी' ह्या चित्रपटाचे लेखक आचार्य अत्रे व निर्माते दिग्दर्शक विनायक यांनी त्यांच्या 'ब्रह्मचारी' चित्र-पटात दाखविली. अजूनही तो चित्रपट मनांत 'ताजा' आहे. आता त्याच विषयावर चित्रपट काढू नये असं म्हणणारे आम्ही कोण ? पण त्यासाठी इतका आचरट आणि भिकार, अतार्किक मसाला वापरावा लागतो काय ? काय त्यातले प्रसंग काय ? घटना काय, संवाद काय, गाणी काय ? अरे, इतकी वर्षं झाली तरी आम्ही अजून 'यमुना जळिं' गुणगुणतो (समोर 'काऽ ही' नसतं मंडळी—गैरसमज नको) 'फिरवा ना सखया जरा डोळा' म्हणतो (आता कोण फिरव-णार डोळा ? घरचेच दोन 'डोळे' 'मोठ्ठे' होतात 'तसा' काही संशय आला तर) अजून 'गाडीत कुण्यांना येऊं देतात का हो ?" असं






विचारणारे विनायक व "हो ! नाहीतर तुम्हांला कसं येता आलं असतं ?" असं खट्याळपणे विचारणारी मीनाक्षी डोळ्यांपुढे उभी राहते. पण 'चला उठा लग्न करा'मध्ये पहिल्या तळ्यातल्या 'सीन' पासून जो 'इनोद' आहे तो पाहिला व महिलांच्या 'फ्री स्टाइल' कुस्तीने जो शेवट साधला आहे तो पाहिला की ब्रह्मचाऱ्याप्रमाणेच आम्हीही संतापतो. बहीण अविवाहित–भाऊ तर प्रतिज्ञाबद्ध ब्रह्मचारी–पण बहीण श्रीमंत (ती नेमके काय करून श्रीमंत झाली आहे हे तुम्हांला कळलं असलं तर' 'बन्याबापू'ला जरा टिप द्या मंडळी) आणि भाऊ दरिद्री बरं का ! ब्रह्मचर्याश्रम काढून बन्याचशा पोळांना 'बदामाचा शिरा' खायला घालणाऱ्या ह्या 'नैष्टिक' ब्रह्मचाऱ्याला म्हणे पैसे हवे होते. त्यासाठी टॅब्लो ! ऐनवेळी 'हीरो'ला अपघात. मग ब्रह्मचारी बनतात विश्वामित्र आणि मग (कचकड्याचे) मूल पाहून अक्षरशः प्रेक्षकातून पळून जातात. विश्वामित्राच्या तपोबलाने (झटपट मूल म्हणजे काय चेष्टा आहे ?) भारावलेले प्रेक्षक त्यांना 'हात' लावीत नाहीत. नैष्टिक ब्रह्मचारी प्रायश्चित्त घेतात. तेव्हां जे साधू महाराज येतात, त्यांचा आवाज, चालणे, बोलणे पायघोळ छाटीतूनही न लपणारी त्यांची 'भरदार' छाती ह्यातलं ह्या (बावळट) ब्रह्मचाऱ्याच्या काहीच ध्यानात येत नाही, खंडाळ्याला ती येते. मग भेटत कां नाही ? दुसऱ्या पुरुषाशी उत्तुंग प्रणयचेष्टा कां करीत राहते ? मग फ्रीस्टाइल कुस्तीने त्याला तिचे प्रेम कळते काय ? हा मार्ग मोठा गमतीचा आहे. अविवाहित मुलीनी करून पाहण्यासारखा प्रकार आहे खरा हा ! त्या दारासिंग-रंधवांची कुस्ती कोण पाहील मग ? आजपर्यंत मराठी चित्रपटांना कथा असते, काही प्लॅन असतो. हेतु असतो, वगैरे गैरसमज-समज होते. पण अलिकडे ह्या बाबतीत हिंदी चित्रपटवाल्यांहूनही आमचे निर्मिति-दिग्दर्शक पुढे गेलेले दिसतात. नायिकेचे 'महाराज' पण एकाही बजरबट्टूच्या ध्यानांत येत नाही ! एरव्ही स्वतःला बुद्धीचा 'गड्डा' म्हणविणाऱ्या नायकाच्याही ? त्याचा आश्रम कशावर चालतो ? ते 'पोळ' नेमके काय खातात ? कशाच्या जिवावर खातात ? मग गांवोगाव प्रचार-मठ काढताना पैसा कां कमी पडतो ? रामदासांच्या मठ संप्रदायाची केलेली टिंगल संतापजनक आहे. कहाँ राजा भोज और कहाँ यह गंगा (राजा गोसावी) तेली ? ह्या चित्रपटाने कथा, संगीत, साऊंड रेकॉर्डिंग वगैरे बाबतीत 'भयानक' परागति केली आहे. चला 'ऊठा' हा मराठीचा 'खून' त्याहून भयानक आहे. धडे घ्या धडे शुद्धलेखनाचे आणि म्हणे हे लोक 'मराठी' चित्रपट काढतात. मराठी प्रेक्षकांनी मराठीच्या अभिमानाने व मऱ्हाठी बाण्याने (जय शिवसेना) हा चित्रपट पहावा अशी निर्मिति-दिग्दर्शकांची अपेक्षा आहे. पण 'मऱ्हाठी' बाणा वेगळ्याच अर्थाने मराठी माणसांनी दाखवावा असा हा चित्रपट आहे. मराठी चित्रपटात 'मराठी' स्त्रियांनी कमीत कमी वेळा साडी नेसलेला हा बहुधा पहिला मराठी चित्रपट असावा. मराठी मनाचा रांगडा संत तुकाराम म्हणतो.

तुका म्हणे तेथें 'पैंजारा'चे काम । अधमासि अधम ।।

अरे ह्यांना जरा त्या सत्यजित रेकडे तरी पाठवा, नाहीतर प्रभात-हंस-नवयुग-राजकमल (प्रारंभीचे) ते चित्रपट तरी दाखवा. म्हणजे निदान 'कुल' परंपरा तरी कळेल ! परंपरा उघ्वस्त करणाऱ्यांचा काळ हा ! ऐकतो कोण आमचं ? काही वर्षांनी हा 'तुका' कोण असं विचारतील बरं ही मंडळी ! !

## वन बांबूचे पिवळ्या गाते—

"आकाशातिल अधोरेखिते" असं मर्ढेकर म्हणून गेले. ही अधोरेखिते घरोघर 'घरघर' करीत असतात. पण मनात काही काही रेखिते 'घर' करून राहतात आणि मग दिल् दाद देऊन जातं "वाहव्वा ! ! (चेंडू लहानपणीच गेलेला असतो ह्याची खंत वाटते कधी कधी. पण. . . .) अलिकडे आकाशवाणीवर मराठीला अधिक वेळ द्यावा, जाहिराती द्याव्यात वगैरे सुधारणांची भाषा ऐकू येते. तें होईल (अगर होणार नाही– कारण जाहिरातीबद्दलची 'जाहिरात' बरेच दिवस ऐकतो आहोत) इंदिराजी गेल्या. रेड्डी गेले. शहा आले– रोग रेडियोचा नाही. राज्ययंत्रणेतील 'लाल फितीं'चा व काळकाढूपणाचा आहे. ते घडले न घडले तरी एक गोष्ट नक्की ! अलिकडे मराठी कार्यक्रमात खूप खूप सुधारणा झाली– होऊं लागली आहे. आणखी काही श्रीयुत ह्या मालेतले 'नमुने' (व व्याख्यानेही) आवडले. ते सारे 'श्रीयुत' कधीतरी एखाद्या 'व्यक्ति-वल्लीप्रमाणे कपाटात येऊन बसायला हरकत नसावी. 'सरकारी' पुस्तकात त्यांचा नंबर लागावा असे मला वाटते. रेडियोवरील नाथषष्टीचा कार्यक्रम, बखले बुवांच्या पुण्यतिथीचा कार्यक्रम, पु. ल. देशपांडे वाचीत असलेले सत्याचे प्रयोग, आमचा देश, आमची परंपरा, रेडियोवर सादर करण्यात आलेल्या सांगाती (श्रीहरि जोशी–दोनदां ध्वनिक्षेपित) प्रा. विद्याधर पुंडलिक यांची 'रंग' ह्या दोन श्रुतिका इत्यादि कार्यक्रम जमेच्या बाजूस धरले पाहिजेत. मध्यतरी पुणे रेडियो केंद्रावरून सहक्षेपित करण्यात आलेली श्रुतिका इतकी 'भिकार' होती. तिचे लेखन व ध्वनिक्षेपण म्हणजे महाभयंकर शिक्षा वाटली बुवा ! दुसरं एक काय होतं की एकच गाणं चार पाच चालीत (त्यातल्या काही मनातल्या त्या गाण्याच्या 'प्रतिमा' उघ्वस्त करून टाकणाऱ्या) दिवसातून ऐकावं लागतं. बाटल्यांची लेबलं निराळी असतात. पण दारू (खरं तर 'बेवडा'सुद्धां म्हणणं धाडसाचं) मात्र तीच असते. हे टाळता येणार नाही काय ? शास्त्रीय व नाट्य-संगीत मात्र 'ए वन्' पद्धतीने सादर केलं जातं. रविवारचे 'चित्रपट' चांगले असतात. महिन्याची गीते (भावसरगम) चांगली असतात (काही नव्या व चांगल्या कवींना 'चान्स' द्या की– गैरसमज नको– मी व सौ. मी 'कवि' नाही) 'गीतरामायण' पुणे केंद्राने दिले. तसे मुंबई केंद्राने अलिकडेच प्रकाशात आलेली व लोकप्रिय झालेली गीत शिवायन, गीत गोपाल, गीत शाकुंतल वा गीत भारत कां ध्वनिक्षेपित करूं नयेत? मोघूबाई कुर्डीकर काही नेहमी जलशाला बसत नाहीत. त्यांचा अलिकडला जलसा 'रीले' करता आला नसता काय ? परवा 'शमसुद्दिन' तबलजी अचानक वारले. 'शमसुद्दिन'चा तबला मी ऐकला आहे मंडळी. त्यांचा 'तबला' 'टेप केलेला असल्यास रेडियोने सादर करावा हीच कलावंत शमसुद्दिनना श्रद्धांजलि ठरेल. अशा 'टेप' म्हणजे धन आहे धन, जपले पाहिजे.

**--बन्याबापू**










## आज इथे तर उद्यां कुठे ?

**अशी** स्थिती भटक्या जमातीतल्या लोकांची असते असे आपण मानतो. 'विंचवाचे बिन्हाड पाठीवर' म्हणून त्याच्या स्थितीचे वर्णनही आपण करतो. पण सध्या काँग्रेसने काही प्रांतात जी मंत्रिमंडळे बनविली आहेत, त्यांची डळमळती आसने पाहिली की त्यांचे मंत्रीही "आज इथे (म्ह. खुर्चीत) तर उद्या कुठे?" असाच प्रश्न मनाला विचारीत प्रतिदिनी घरी जात असावेत असे वाटते. हरयाना प्रांतात काँग्रेसचे मंत्रिमंडळ होते. उत्तर प्रदेशांत इंदिराजींची कृपा म्हणून अवघ्या सत्तर मतांनी निवडून आलेल्या चंद्रभान गुप्त। ह्यांचे मंत्रिमंडळ अस्तित्वात आले होते. विहार, ओरिसा, पं. वंगाल, ह्या प्रांतात तर विरोधी पक्षांचीच मंत्रिमंडळे होती. आहेत. पण उत्तर प्रदेशही आपल्या हातून जाईल असे स्वप्नही इंदिराजींनी कधीं पाहिले नसेल. गेल्या वीस वर्षातच नव्हे तर काँग्रेसच्या स्वातंत्र्य लढ्यात 'उत्तर प्रदेश' हा नेहमीच काँग्रेसचा बालेकिल्ला मानला जात होता. परंतु काँग्रेस गेल्या निवडणुकीने दिलेले बोध गिळायला तयार नाही असेंच दिसून येत आहे. 'हरयाना' प्रांतात पंजाबच्या विभागणीनंतर भगवतदयाळ शर्मा ह्यांचे मंत्रिमंडळ होते. नव्या निवडणुकीनंतरही पुन्हा शर्माजी हेच नेते म्हणून निवडून आले. निवडणुकीत आपले 'स्थान' अढळ राखण्यासाठी शर्माजींनी राजकीय विरोधकांना मुद्दाम असे मतदारसंघ दिले की, त्यांनी पराभूत व्हावे. परंतु अवघ्या तेरा दिवसात राजिनामा देऊन शर्माजींना बाहेर पडावे लागले. डाव उलटला आहे. राव बिरेंद्र सिंग ह्याना विचारून आपण मंत्रिमंडळ बनवूं असे आश्वासन शर्माजींनी दिले होतें. पण खुद्द बिरेंद्रसिंग ह्यांनाच त्यांनी वगळले व गटबाजीचे स्वतःच बळी झाले आहेत. उत्तर प्रदेशांत जवळजवळ तसेंच घडले आहे. गटबाजीपायी गेली ४५ वर्षे काँग्रेसमध्ये निष्ठेने काम केलेले चरणसिंग बाहेर फेकले गेले. चरणसिंगाला आम्ही भंगी बनवूं, असे उद्‌गार काढेपर्यंत काँग्रेसच्या सत्ताधारी गटाची मजल गेली. शेवटी चरणसिंग बाहेर पडले. आज जनकाँग्रेसबरोबर अन्य विरोधी पक्षीय सदस्यांचे मंत्रिमंडळ अस्तित्वांत आले आहे. गुजराथ व मध्यप्रदेशांतही असेच बखेडे चालूं आहेत अशा वार्ता कानी येत आहेत. सौराष्ट्राला गुजराथच्या मंत्रिमंडळात योग्य तो न्याय मिळालेला नाही अशी खंत वाटते आहे, तर मध्यप्रदेशांत 'विंध्य भागाला' न्याय मिळाला नाही अशी भावना पसरली आहे. त्यामुळे हरयाना, उ. प्रदेशाप्रमाणे तेथेही सत्ताधारी विंचू आपले बिन्हाड पाठीवरच मिरवीत असावेत असे मानायला हरकत नाही. सोळा राज्यांपैकीं बिहार, ओरिसा, पंजाब, पं. बंगाल, केरळ, मद्रास, हरयाना उत्तरप्रदेश, दिल्ली ह्या ठिकाणी आता काँग्रेसचें राज्य नाही आणि राजस्थानमध्येही ते अस्तित्वात येऊ शकत नाही ही दगडावरची रेघ आहे. आजचे मरण उद्यावर ढकलण्याचा काहीसा अत्युत्साही व पोरकट खेळ खेळला जात आहे. महाराष्ट्र, म्हैसूर, गुजराथ व मध्यप्रदेश हे तूर्तास काँग्रेस पक्षाच्या हाती आहेत. त्यांतल्या दोन प्रांतात अशांति आहे. हे सारे चित्र फारसे स्पृहणीय नाही. काँग्रेसमधील अंतर्गत सत्तास्पर्धा, गटबाजी, वैयक्तिक महत्वाकांक्षा व केंद्रीय नेत्यांचे अयोग्य धोरण ह्यामळे प्रांतोप्रांती काँग्रेस खिळखिळी झाली आहे. पंडितजी असतांनाही हे नव्हते असे नाही. पण सारे त्यांच्या जरबेत होते. आज तशी स्थिति नाही. त्यामुळे सर्वच एक प्रकारची अनिश्चितता दिसत आहे. 'आज आपण खुर्चीवर आहोत,' एवढेच सत्य आजचे सत्ताधीश मनोमन मानून आहेत. दोन सुंदोपसुंदातले हे घरगुती भांडण आता चव्हाटयावर येत आहे. 'ओळखीचा चोर जीवे मारी' ह्या न्यायाने ही घरचीच माणसे आता हत्यारे परजीत निघाली आहेत. आणि काँग्रेसला पदभ्रष्ट करण्याची संधी शोधणारे विरोधी पक्ष त्यांना सहाय्य करीत आहेत. ही युति टिकली तर कदाचित् काही चांगले घडेलही. पण टिकणे ही वाटते इतकी सोपी गोष्ट नाही. खुद्द एक पक्षीय लोकशाहीतही सत्तास्पर्धा, गटबाजी, डावे उजवे चालले होते. आता अनेक पक्षीय मोट बांधली जात आहे. ह्या युती आता काय काय चमत्कार करतात तेच पहावयाचे आहे. फक्त पक्षांतर जर इतके 'सवंग' झाले तर स्थिर शासन लाभावे कसे एवढीच महत्त्वाची समस्या आहे. एकत्वाची पथ्यें तरी मग कोणती राहतील? व ती तरी मानली जातील कशावरून ? नाहीच मानली गेली तर पुढे काय ? विचार होणे अगत्याचे वाटते.

**—सारस्वत**

### क्षमा असावी

'दीपावली'च्या एप्रिल अंकात पान ५३ वर "कानडी कीचक वध" अशी चौकट आहे. त्यात कै. खाडिलकर यांची आद्याक्षरें नजरचुकीने य. कृ. अशी पडली आहेत. वस्तुतः ती कृ. प्र. अशी हवी होती.

अनवधानाने ती चूक झाली याबद्दल दिलगीर आहोत.

**—सम्पादक**

REGD. NO MH-450 Licence No 170 to post without pre-payment MAY 1967

DIPAVALI MONTHLY



COVER PRINTED AT ASHA PRINTERY, BOMBAY 4.